॥ श्री ॥

# सुलभ श्रीमद्भागवत

## षष्ठ स्कंध

### अध्याय १ ला

राजा म्हणाला,—हे भगवन्, ज्याच्या योगानें क्रमाक्रमानें अर्चिरादि मार्गेंकरून प्राप्त झालेल्या ब्रह्मदेवासह साधक पुरुषांना मोक्ष प्राप्त होतो, तो निवृत्तिमार्ग तूं पूर्वी मला सांगितलास ॥ १ ॥ तसाच, हे मुने, स्वर्गादिसुख हेंच ज्याचें फळ आहे व मायाबद्ध पुरुषाला ज्याच्या योगानें वारंवार जन्म प्राप्त होतो, तो प्रवृत्तिलक्षण मार्गहि तूं मला सांगितलास, ॥ २ ॥ त्याचप्रमाणें अधर्मलक्षणरूप नाना प्रकारच्या नरकांचेंहि वर्णन केलेंस आणि ज्यामध्यें प्रथम स्वायंभुव मनु झालाल्या पहिल्या मन्वन्तराचेंहि वृत्त तूं मला सांगितलेंस ॥ ३ ॥ प्रियव्रत आणि उत्तानपाद ह्यांचा वंश व त्यांचीं चरित्रें कथन करून द्वीपें, खंडें, समुद्र, पर्वत, नद्या, बागा व वनस्पति हे विभाग, लक्षणें आणि प्रमाणें ह्यांसह तूं मला सांगितलेंस, तशीच भूमंडळाची, ज्योतिर्गणाची आणि सप्तपाताळांची रचना प्रभूनें जशी केली आहे तशी तूं मला सांगितलीस ॥ ४ ॥ २ ॥ आतां हे महाभाग्यवंता, नाना प्रकारच्या भयंकर यातनांनीं युक्त अशा नरकांस ज्या उपत्यानें पुरुप जाणार नाहीं असा उपाय या प्रसंगीं मला तूं सांग ॥ ६ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, या जन्मामध्यें पुरुष, कायावाचामनेंकरून केलेल्या पापांचें याच जन्मामध्यें मन्वादिकांनीं सांगितलेल्या धर्मशास्त्राप्रमाणें जर प्रायश्चित्त करणार नाहीं, तर तो पापी मेल्यावर, मीं जे तुला भयंकर यातनांनीं युक्त असे नरक सांगितले, त्या नरकांप्रत खरोखर जाईल ॥ ७ ॥ म्हणून रोगाचें निदान जाणणारा वैद्य ज्याप्रमाणें दोषांचा कमजास्तपणा पाहून औषधाची योजना करितो, त्यप्रमाणें मरणाचे पूर्वी या जन्मींच व त्यांतूनहि रोगादिकांनीं देह पीडित झाला नाहीं तोंपर्यंतच मनाचें संयमन करून आणि पापाचें अल्पत्व अथवा महत्त्व जाणून त्यांचें प्रायश्चित्त करण्याकरितां पुरुषानें त्वरित प्रयत्न करावा ८ ॥

राजा म्हणाला,—हे मुने, प्रत्यक्ष दृष्टीस पडणारें राजदंडादिक दुःख व ऐकून ठाऊक झालेलें नरकपतनादिक दुःख यांच्या योगानें पाप हें आपला शत्रु आहे असें जाणत असतांहि, हा जीव प्रायश्चितानंतर जर फिरून पापवासनांच्या स्वाधीन होऊन पातक करितो, तर प्रायश्चित्तांचा उपयोग तरी काय? ॥ ९ ॥ आणि त्यांतूनहि कधीं हा जीव पातकापासून निवृत्त झाला तरी फिरून त्याच पापाचें आचरण करितो. तात्पर्य, जसें हत्तीला स्नान घातलें असतांहि तो पुनः धुरळ्यानें आपलें शरीर मळवितो, त्याप्रमाणें मनुष्याचेंहि होत असल्यामुळें प्रायश्चित्त अगदीं व्यर्थ आहे असें मला वाटतें ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, कृच्छ्रादि प्रायश्चित्तरूपानें पातकांचा समूळ नाश होत नाहीं; कारण प्रायश्चित्ताचा अधिकारी अज्ञानी पुरुष आहे, ह्याकरितां अज्ञान नाहींसें होत नसल्यामुळें केलेल्या प्रायश्चित्तांनीं जरी जुनें पातक नष्ट झालें, तरी त्या पूर्वपातकाच्या संस्कारानें फिरून फिरून दुसऱ्या पातकाची उत्पत्ति होत्येच; म्हणून ज्ञानप्राप्ति होणें हेंच खरोखर पापाचें मुख्य प्रायश्चित्त होय ॥ ११ ॥ आणि हे राजा, ज्याप्रमाणें पथ्यरूपच अन्न भक्षण करणाऱ्या पुरुषाला व्याधिजन्य पीडा होत नाहींत, त्याप्रमाणें नियमानें वागणारा पुरुष हळूहळू तत्त्वज्ञानास पात्र होतो ॥ १२ ॥ हे राजा, ज्याप्रमाणें वेळूच्या घर्षणानें उत्पन्न झालेला अग्नि त्याचें सर्व बेट दग्ध करितो, त्याप्रमाणें तप, ब्रह्मचर्य, मनःसंयमन, दान, सत्य, शौच, अहिंसादि यम व जपादि नियम ह्यांच्या योगानें श्रद्धायुक्त असलेले धर्मज्ञ विवेकी पुरुष, कायावाचामनेंकरून घडलेल्या मोठ्याहि पातकांचा नाश करितात ॥ १३ ॥ १४ ॥ परंतु असें होणें कठिण असल्यामुळें ज्याप्रमाणें सूर्य अंधकाराचा नाश करितो, त्याप्रमाणें कित्येक वासुदेवपरायण लोक, केवळ भक्तीच्याच योगानें पातकांचा समूळ नाश करितात ॥ १५ ॥ हे राजा, ज्याप्रमाणें कृष्णाच्या ठिकाणीं प्राणसुद्धां अर्पण केलेला पातकी पुरुष, भगवद्भक्तांच्या निरंतर सेवेनें शुद्ध होतो, त्याप्रमाणें तपश्चर्यादिकांनीं तो शुद्ध होत नाहीं ॥ १६ ॥ कारण दयाळु व निष्काम असे ईश्वरपरायण लोक या भक्तिमार्गांत असतात व तो सर्व प्रकारें निर्भय असल्यामुळें तोच या लोकीं फार चांगला क्षेमकारक आहे ॥ १७ ॥ हे राजेंद्रा, ज्याप्रमाणें मद्याच्या कुंभाला नद्या पवित्र करूं शकत नाहींत, त्याप्रमाणें नारायण-विमुख पुरुषाला त्यानें आचरण केलेलें प्रायश्चित्त पवित्र करीत नाहीं ॥ १८ ॥ परंतु या संसारामध्यें ज्यांनीं श्रीकृष्णाच्या गुणांवर प्रीति करणारें आपलें मन त्या श्रीकृष्णाच्या चरण-कमलाच्या ठिकाणीं एकवार तरी लाविलें आहे व तेवढ्यानेंच ज्यांच्या पापाचें प्रायश्चित्त झालें आहे, ते लोक यमाला आणि पाश धारण करणाऱ्या त्याच्या दूतांना स्वप्नामध्येंहि अवलोकन करीत नाहींत. ॥ १९ ॥ असो. ह्याविषयीं एक पुरातन इतिहास सांगतात, तो इतिहास म्हणजे विष्णूच्या दूतांचा यमाच्या दूतांबरोबर झालेला संवाद होय. तो तूं मज-पासून श्रवण कर ॥ २० ॥ कान्यकुब्जनामक नगरामध्यें आजामिळनामक कोणी एक दासीपति द्विज राहात असे. तो पूर्वीं सदाचारसंपन्न ब्राह्मण असून त्या दासीच्या संसर्गानें दूषित झाल्यामुळें त्याचा सदाचार नष्ट झाला होता ॥ २१ ॥ वाटसरू लोकांस लुटणें, द्यूत खेळणें, फसविणें व चोऱ्या करणें अशा निंद्य वृत्तीचा आश्रय करून तो अपवित्र अजामिळ,

कुटुंबपोषण करण्याकरितां प्राण्यांना पीडा देत असे ॥२२॥ हे राजा, अशा दुराचारानें वागणाऱ्या व त्या दासीच्या पुत्रांचें लालनपालन करणाऱ्या त्या अजामिळाच्या आयुष्यापैकीं अठ्ठयाऐशीं वर्षांचा काळ निघून गेला ॥ २३ ॥ त्या वृद्ध पुरुषाला त्या दासीपासून दहा पुत्र झाले होते; त्यांमध्यें नारायण नांवाचा कनिष्ठ पुत्र अगदीं अल्पवयी होता आणि ह्यामुळें आईबापांना तो अत्यंत प्रिय होता ॥ २४ ॥ अस्पष्ट व मधुर भाषण करणाऱ्या त्या बालकाच्या ठिकाणीं त्या वृद्ध अजामिळानें आपलें अन्त:करण अगदीं बद्ध केलें होतें, व त्याचे खेळ पाहून तो अत्यंत आनंदित होत असे ॥ २५ ॥ त्या बालकावर असलेल्या प्रेमानें तो इतका कांहीं बद्ध होऊन गेला होता कीं, आपण स्वत: भोजन, पान व कांहीं भक्षण करीत असतांहि तो प्रथम त्या बालकाकडून भोजन व पान करवीत असे; परंतु त्या मूढाला अगदीं जवळ आलेला मृत्यु मात्र समजला नाहीं ॥ २६ ॥ असो. ह्याप्रमाणें वागणाऱ्या त्या अज्ञ अजामिळानें मृत्युकाळ प्राप्त झाला असतांहि त्या बालवयी नारायणनामक आपल्या पुत्रावरच सारें लक्ष ठेविलें होतें ॥ २७ ॥ इतक्यामध्यें हस्तामध्यें पाश धारण केलेले, अत्यंत भयंकर, वांकड्या तोंडाचे आणि उभ्या केसांचे असे आपणास नेण्याकरितां आलेले तीन पुरुष त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां त्याचीं इंद्रियें अगदीं व्याकुळ झालीं असल्यामुळें दूर खेळत असलेल्या त्या आपल्या नारायणनामक पुत्राला दीर्घ उंच अशा स्वरानें त्यानें हाक मारली ॥२८॥२९॥ शुकाचार्य म्हणतात,–हे राजा, तेव्हां मरणोन्मुख झालेला तो अजामिळ हरिकीर्तन करीत आहे असें श्रवण करून विष्णूचे पार्षदगण एकाएकीं त्या ठिकाणीं आले. कारण, तो जें आपल्या पुत्राचें नांव घेत होता तें त्यांच्या स्वामीचें होतें ॥ ३० ॥ असो. तेथें आल्यानंतर त्या विष्णुदूतांनीं, हृदयांतून अजामिळाच्या जीवात्म्याला बाहेर ओढून काढणाऱ्या यमदूतांचें स्वसामर्थ्यानें निवारण केलें ॥ ३१ ॥ ह्याप्रमाणें विष्णुदूतांनीं यमदूतांना अडथळा केला असतां ते त्यांना म्हणाले,–'धर्मराजाच्या आज्ञेला अडथळा करणारे तुम्ही कोण आहां ? ॥३२॥ तुम्ही कोणाचे दूत आहां व कोठून आलां ? आणि कशाकरितां तुम्ही आम्हांला याला नेऊं देत नाहीं ? तुम्ही देव, उपदेव किंवा कोणी उत्तमसिद्धजन आहांत काय ? ॥३३॥ अहो,तुम्हां सर्वांचे नेत्र कमलपत्राप्रमाणें असून तुम्हीं पिवळीं रेशमीं वस्त्रें परिधान केलीं आहेत. किरीट, कुंडलें व दैदीप्यमान कमळांच्या माळा तुम्हीं सर्वांनीं धारण केल्या असून सर्वांचेंहि वय तरुण दिसत आहे. तुम्हां सर्वांना सुंदर असे चार चार भुज आहेत व ते धनुष्य, भाता, खड्ग, गदा, शंख. चक्र आणि कमळ ह्यांच्या योगानें सुशोभित झाले असून आपल्या प्रभेच्या योगानें अंधकार हरण करीत आहेत. तुम्ही आम्हां धर्मपालांच्या दासांचा निषेध काय म्हणून करितां ? ॥ ३४ ॥ ३५ ॥ ३६ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्राजा, ह्याप्रमाणें त्या यमदूतांनीं भाषण केलें असतां वासुदेवाच्या आज्ञेप्रमाणें वागणारे विष्णुदूत किंचित् हास्य करून मेघासारख्या गंभीर वाणीनें त्यांना उत्तर देऊं लागले ॥ ३७ ॥

विष्णुदूत म्हणाले,—अहो, तुम्ही जर खरोखर धर्मराजाच्या आज्ञेप्रमाणें वागणारे आहांत,तर धर्माचें तत्त्व आणि धर्माचें जें लक्षण असेल तें आम्हांस सांगा बरें ! ॥३८॥

कोणत्या प्रकारानें कोणास कसा दंड करावा, दंडाला योग्य असे पात्र कोणते ? आणि कर्म करणारे सगळेच प्राणी दंडास योग्य आहेत काय ? अथवा फक्त मनुष्यांतूनच कांहींना तसा दंड योग्य आहे ? ॥ ३९ ॥

यमदूत म्हणाले,—हे विष्णुदूत हो, धर्म हा वेदविहित आहे, व अधर्म हा त्याच्या उलट म्हणजे वेदानें निषिद्ध असा आहे. वेद हा स्वतःच नारायणाच्या श्वासापासून उत्पन्न झालेला असल्यामुळें साक्षात् नारायणच आहे असें आम्हीं ऐकिलें आहे ॥ ४० ॥ आतां हा नारायण कोण म्हणून विचाराल तर, हे विष्णुदूत हो, ज्यांच्या योगानें स्वस्वरूपाच्या ठिकाणीं रज, सत्त्व आणि तम ह्यांनीं बनलेले हे प्राणी, गुण, नामें, कर्में आणि रूपें ह्यांच्या योगानें यथायोग्य रीतीनें निरनिराळे समजले जातात तो नारायण होय ॥ ४१ ॥ आतां अमुक एका मनुष्यानें अधर्म केला हें कोठून समजतें असें म्हणाल तर, सूर्य, अग्नि, आकाश, वायु, इंद्रियाभिमानी देवता, चंद्र, संध्या, अहोरात्र, दिशा, उदक, पृथ्वी, काल आणि धर्म हे जीवाचे साक्षी आहेत ॥ ४२ ॥ तेव्हां ह्या सूर्यादिकांच्या योगानें अधर्म समजला म्हणजे दंडाच्या पात्राचीहि योजना करितां येत्ये आणि कर्म करणारे एकंदर सर्व प्राणी आपापल्या कर्मानुसार दंडास पात्र होतात ॥ ४३ ॥ अहो निष्पाप विष्णुदूत हो, कर्म करणाऱ्या प्राण्यांना गुणांचा संग असल्यामुळें शुभ व अशुभ अशीं दोन्ही कर्में त्याच्या हातून होण्याचा संभव असतो. आतां जर कोणी कर्मकर्ता नसेल तर त्याचे हातून वाईट कामें होणार नाहींत; परंतु असें होतच नाहीं. कारण, कर्म न करणारा असा कोणीहि देहां धारी प्राणी नाहीं. यास्तव कर्म करणारे सर्व प्राणी पातक अवश्य घडत असल्यामुळें दंडास पात्र होतात ॥ ४४ ॥ असो. मनुष्यलोकीं ज्यानें जसा व जितका धर्म अथवा अधर्म केलेला असेल त्याला परलोकीं तसें व तितकेंच त्याचें फळ निःसंशय भोगावें लागतें ॥ ४५ ॥ केवळ सूर्यादिकच धर्माधर्म कळविणारे आहेत असें नाहीं, तर अर्थापत्तीनेंहि* ही गोष्ट सिद्ध होते ॥ ४६ ॥ अहो देवश्रेष्ठ हो, गुणांचा त्रिविधपणा असल्यामुळें या जन्मीं ज्याप्रमाणें प्राण्यांमध्यें शांतपणा, घोरपणा आणि मूढपणा, अथवा सौख्य, दुःख व त्यांचें मिश्रण यांच्या योगानें सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार उपलब्ध होतात, त्याप्रमाणें जन्मांतरीं सुद्धां ते असल्याचें अनुमान होतें. सध्यांचा काळ ज्याप्रमाणें मागें गेलेल्या व पुढें येणाऱ्या कालांचे गुण दर्शवितो; त्याचप्रमाणें हा जन्महि मागल्या व पुढल्या अशा दोन्ही जन्मांतील धर्म व अधर्म हे दाखवितो ॥४७॥ अंतर्यामिरूपानें देहामध्यें असलेला हा यमनामक देव, जीवाचें पूर्वरूप विशेषेंकरून

* **अर्थापत्ति** हें सहा प्रमाणांपैकीं एक प्रमाण आहे. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शाब्द, अर्थापत्ति व अनुपलब्धि अशीं तीं प्रमाणें होत. देवदत्त नांवाचा मनुष्य दिवसा काहीं एक खात नाहीं, परंतु तो धष्टपुष्ट आहे. ह्या उदाहरणांत धष्टपुष्टपणामुळें तो रात्रीं यथेच्छ भोजन करीत असला पाहिजे, हा जो अनुमानानें सिद्ध करण्याचा प्रकार, त्यास अर्थापत्ति म्हणतात.

मनानेंच अवलोकन करितो आणि नंतर मनाच्याच योगानें तो त्याच्या पुढील रूपाचा विचार करितो. कारण, तो षड्गुणैश्वर्यसंपन्न असून जन्मादिविकाररहित आहे ॥ ४८ ॥ परंतु हा जीव तर ईश्वरानें प्राप्त करून दिलेल्या विद्यमान देहाला मात्र जाणत असून मागचा व पुढचा हे दोन देह तो जाणत नाहीं. निजलेला पुरुष ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें प्राप्त झालेल्या देहादिकाविषयीं 'हा मी' असा अभिमान धारण करितो, पण त्या वेळीं जाग्रदवस्थेंमध्यें असलेल्या देहादिकांचें त्याला भान राहत नाहीं; त्याचप्रमाणें हा अज्ञ जीव पूर्वकर्माच्या योगानें प्राप्त झालेल्या ह्या देहालाच 'हा मी' असें मानितो. पूर्वीच्या अथवा पुढच्या देहास तो जाणत नाहीं. कारण, ह्या जन्माच्या योगानें त्याची 'इतर जन्माविषयीची' स्मृति नष्ट झालेली असत्ये ॥ ४९ ॥ हा जीव पांच कर्मेंद्रियांच्या योगानें वस्तुग्रहण व वस्तुत्याग इत्यादि कर्में करितो, व पांच ज्ञानेंद्रियांच्या योगानें शब्दादि पांच विषय जाणतो. तो पांच प्राणांच्या योगानें देहाचें पोषण करितो; आणि सोळाव्या मनासह सतरावा आपण स्वतः, ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व मन यांच्या विषयांचा उपभोग घेतो ॥ ५० ॥ असो. हें षोडश कलांनीं युक्त असलेलें, गुणत्रयापासून झालेलें व अनादि असें लिंगशरीर, त्यांत बद्ध झालेल्या जीवाला, हर्ष, शोक, भय व पीडा देणाऱ्या संसारामध्यें वारंवार भ्रमण करावयास लावितें ॥ ५१ ॥ यास्तव हें लिंगशरीरच, कामक्रोधादि षड्रिपु ज्यानें जिंकिले नाहींत अशा देहधारी अज्ञ जीवाकडून त्याला इच्छा नसतांहि कर्में करवितें. ज्याप्रमाणें कोळी आपल्या तंतुवेष्टनरूप कर्माच्या योगानें आपल्याला बद्ध करून घेतो; परंतु त्यांतून बाहेर जाण्याचा उपाय मात्र तो जाणत नाहीं, त्याचप्रमाणें जीव कर्माच्या योगानें आपल्याला आच्छादित करून घेतो; पण त्यांतून मुक्त होण्याचा मार्ग जाणत नाहीं ॥ ५२ ॥ ह्याविषयीं अनुभवाचेंहि प्रमाण आहे. कारण कोणताहि जीव क्षणभर देखील कर्म केल्यावांचून कदापि राहात नाहीं. कारण, पूर्वकर्मसंस्कारापासून झालेल्या गुण-कार्यरूप ज्या वासना परवश झालेल्या जीवांकडून बलात्कारानें कर्म करवितात ॥ ५३ ॥ त्या अदृष्टरूप निमित्त झालें असतां, निमित्ताला अनुरूप असें स्थूल अथवा सूक्ष्म शरीर जीवाला प्राप्त होतें; आणि तें बलिष्ठ कर्मवासनेमुळें आईच्या किंवा पित्याच्या स्वभावासारखें होतें ॥ ५४ ॥ याप्रमाणें प्रकृतीच्या संगामुळें पुरुषाचें जें हें अवस्थांतर विपर्यासाला प्राप्त होतें, तें परमेश्वराच्या भजनानें स्वल्प काळांतच नाहींसें होतें ॥ ५५ ॥ असो. पूर्वी हा अजामिळ विद्यासंपन्न, सुस्वभावी, सदाचारी, क्षमादिक गुणांचें केवळ निवासस्थान, पूजादि नियम धारण करणारा, सौम्य, इंद्रियदमन करणारा, सत्यवादी, मंत्रवेत्ता, पवित्र; गुरु, अग्नि, अतिथि आणि वृद्ध ह्यांची शुश्रूषा करणारा, निरभिमानी, सर्व प्राणिमात्रांचा मित्र; साधु, मितभाषी आणि मत्सररहित असा होता ॥ ५६ ॥ ५७ ॥ परंतु पित्याच्या आज्ञेप्रमाणें वागणारा हा ब्राह्मण, एकदां वनामध्यें गेला आणि फळें, पुष्पें, समिधा व दर्भ हे घेऊन तेथून घरीं येण्यास माघारा फिरला ॥ ५८ ॥ येतांना त्याला मार्गामध्यें जवळच मद्य प्राशन केल्यामुळें जिचे डोळे फिरून गेले आहेत, व त्यामुळें जिचें वस्त्र

अतिशय सैल झालें आहे, अशा एका वेश्येसह क्रीडा, गायन व हास्य करीत असलेला आचारभ्रष्ट असा कोणी निर्लज्ज कामुक शूद्र त्याच्या दृष्टीस पडला ॥ ५९ ॥ ६० ॥ कामोद्दीपन करणाऱ्या उरव्या लाविलेल्या आपल्या बाहूनें तो शूद्र तिला आलिंगन देत आहे असें पाहून, हा अजामिळ एकाएकीं अत्यंत मोहित होऊन कामवश झाला ॥ ६१ ॥ त्या वेळीं जितकें म्हणून धैर्य व ज्ञान त्याला होतें त्यांचा उपयोग करून तो आपलें मन आवरूं लागला; पण मदनानें कंपित झालेल्या मनाचें नियमन त्याला शेवटीं करतां आलें नाहीं ॥६२॥ ह्याप्रमाणें स्त्रीदर्शनामुळें उत्पन्न झालेल्या कामरूप ग्रहानें त्या अजामिळाला ग्रासून टाकिलें असतां, त्याची स्मृति नष्ट झाली; आणि तो सर्वदा मनामध्यें तिचेंच चिंतन करीत राहिल्यामुळें स्वधर्मापासून भ्रष्ट झाला ॥ ६३ ॥ नंतर मनोहर अशा ग्राम्यविषयांनीं तिला प्रसन्न करून घेण्यासाठीं, तिला त्यानें आपल्या पित्याचें सर्व द्रव्य देऊन संतुष्ट केलें ॥ ६४ ॥ नंतर लबाडस्त्र त्या जारिणी स्त्रीच्या नेत्रकटाक्षांनीं अन्तःकरण विद्ध झाल्यामुळें त्या पातकी अजामिळानें मोठ्या कुळामध्यें उत्पन्न झालेल्या आपल्या विवाहित व तरुण अशा ब्राह्मणकुलोत्पन्न भार्येचा त्याग केला ॥ ६५ ॥ पुढें बापानें मिळविलेलें द्रव्य संपल्यावर हा मंदमति अजामिळ न्यायानें अथवा अन्यायानें कोठून तरी द्रव्य संपादन करून त्या वेश्येच्या परिवारासह कुटुंबाचें पोषण करूं लागला ॥ ६६ ॥ याप्रमाणें शास्त्राचें उल्लंघन करून हा अजामिळ वागत आला आहे. सज्जनांनीं त्याची निंदा केली आहे. वेश्येकडील अपवित्र पदार्थ भक्षण करून यानें आपलें आयुष्य चिरकाल-पर्यंत पापांत घालविलें आहे ॥ ६७ ॥ एवढें पातक करूनहि ह्यानें त्याचें प्रायश्चित्त केलें नाहीं. अर्थात् आम्ही ह्याला यमराजाकडे घेऊन जातों, म्हणजे त्या ठिकाणीं हा दंडानें शुद्ध होईल ॥ ६८ ॥

## पहिला अध्याय समाप्त

---

# अध्याय २ रा

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, याप्रमाणें यमदूतांनीं केलेलें भाषण श्रवण करून त्या न्यायनिपुण दूतांनीं त्यांना प्रत्युत्तर दिलें ॥ १ ॥

विष्णुदूत म्हणाले,—हरहर ! धर्मज्ञ पुरुषाच्या सभेला अधर्म स्पर्श करीत आहे ही मोठी दु:खाची गोष्ट होय. कारण. या सभेमध्यें धर्मवेत्ते पुरुष दंडास अयोग्य अशा निष्पाप पुरुषांना उगीच दंड करीत आहेत ॥ २ ॥ अरेरे ! जे समदृष्टि साधुलोक प्रजाजनांचे आईबापांप्रमाणें परिपालन करून त्यांना शिक्षण देतात, त्यांच्या ठिकाणीं जर असा विपरीतपणा होऊं लागला तर प्रजाजनांनीं कोणाला शरण जावें ! ॥ ३ ॥ अहो, ह्यांनीं केलेला अधर्म दुसरेहि करूं लागतील, ह्याकरितां हें फार वाईट आहे. कारण, श्रेष्ठ पुरुष जें जें कर्म करितो तेंच कर्म इतर लोकहि करितात व तो श्रेष्ठ पुरुष जें शास्त्र प्रमाण मानितो त्या शास्त्रालाच इतर लोक अनुसरतात ॥ ४ ॥ अरेरे ! जसा पशु, धनी आपलें रक्षण करील किंवा मारील हें कांहींच न जाणतां खुशाल निजतो, त्याप्रमाणें हा लोक निश्चित होऊन ज्याच्या मांडीवर, तो धर्म आहे कीं अधर्म आहे हें स्वत: कांहींएक न जाणतां आपलें शिर ठेवून खुशाल निजतो ॥ ५ ॥ प्राणिमात्रास विश्वास ठेवण्यास योग्य असा पुरुष जर खरोखर सदय असेल, तर ज्यानें विश्वासानें आपला आत्मा त्याच्या स्वाधीन केला आहे व जो आपणांशीं मित्रत्वानें वागत आहे, त्या अज्ञानी जनाचा द्रोह करण्यास तो कसा बरें धजेल ? ॥ ६ ॥ हे यमदूत हो, मोक्षसाधनभूत अशा श्रीहरीच्या नामाचा ज्याअर्थी ह्यानें अगदीं अगतिकगति असतांनाहि उच्चार केला, त्या अर्थी कोटि जन्मांच्याहि पातकांचें ह्यानें प्रायश्चित्त केलें आहे ॥ ७ ॥ यमदूत हो, ‘ नारायणा इकडे ये !’ असा आक्रोश करून पुत्राला हाक मारण्याच्या बुद्धीनें ह्यानें जें चार अक्षरांचें नांव उच्चारिलें, तेवढ्यानेंच ह्या पातक्याच्या पापाचें प्रायश्चित्त झालें आहे ॥ ८ ॥ हे यमदूत हो, चोर, मद्यपी, मित्रद्रोही, ब्रह्मघातकी, गुरुस्त्रीगामी आणि त्याचप्रमाणें स्त्री, राजा, मातापिता आणि गाई ह्यांची हत्या करणारा हे व दुसरेहि जे पातकी आहेत त्या सर्व पातक्यांचें भगवन्नामोच्चारण हेंच श्रेष्ठ प्रायश्चित्त होय. कारण, नामोच्चारण करणाऱ्या पुरुषाविषयीं, ‘ हा माझा आहे, मी सर्व प्रकारें ह्याचें रक्षण केलें पाहिजे ’ अशी विष्णूला बुद्धि उत्पन्न होत्ये ॥ ९ ॥ ॥१० ॥ खरोखर श्रीहरीच्या नांवाच्या शब्दाचा उच्चार केला असतां पातकी पुरुष जसा शुद्ध होतो, तसा मन्वादिक वेदवेत्त्यांनीं सांगितलेल्या प्रायश्चित्तांनीं शुद्ध होत नाहीं. आणि दुसरें असें कीं, कृच्छ्रचांद्रायणादि प्रायश्चित्तें, जशीं केवळ पातकनिवृत्तीनेंच क्षीण होऊन जातात, त्याप्रमाणें नांवाचा उच्चार क्षीण होत नसून श्रेष्ठकीर्ति परमेश्वराच्या गुणांचें ज्ञान करून देतो ॥ ११ ॥ असो. जें केलें असतां मन फिरून पापमार्गाकडे धावूं लागतें, तें प्रायश्चित्त खरोखर पापाची

शुद्धि करणारें नव्हेच. याकरितां पापांचा समूळ नाश करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांनीं बारंवार हरीचें गुणवर्णन करणें हेंच खरें प्रायश्चित्त होय. कारण हा गुणानुवादच खरोखर चित्तशोधक आहे ॥ १२ ॥ ज्या अर्थीं ह्यानें मरतां मरतां भगवन्नामाचा उच्चार करून सर्व पातकांची निष्कृति केली, त्या अर्थीं तुम्ही याला वाईट मार्गानें नेऊं नका ॥ १३ ॥ हे यमदूत हो, पुत्रादिकांना संकेतानें ठेवलेलें, थट्टेनें किंवा गातांना आलाप परिपूर्ण करण्याकरितां घेतलेलें किंवा 'विष्णूचा काय उपयोग आहे ?' अशा अवज्ञेनें उच्चारिलेलें विष्णूचें नांव सर्व पातकांचा नाश करणारें आहे, असें वेदवेत्ते समजतात ॥ १४ ॥ घरावरून पडलेला, मार्गामध्यें अडखळून पडलेला, अवयव भग्न झालेला, सर्पादिकांनीं दंश केलेला, ज्वरानें वगैरे तप्त झालेला व दंडादिकानें ताडित झालेला, अशा पराधीन अवस्थेमध्येंहि ज्या पुरुषानें 'हरि हरि' असें म्हटलें, तरी तो यातना भोगण्यास योग्य होत नाहीं ॥१५॥ हे यमदूत हो, मोठ्या आणि लहान पातकांना, मोठीं आणि लहान प्रायश्चित्तें, तारतम्य जाणून मन्वादि महर्षींनीं सांगितलीं आहेत ॥ १६ ॥ म्हणून तप, दान व जप इत्यादि त्या त्या प्रायश्चित्तांनीं तीं तीं पातकें मात्र नष्ट होतात; पण अधर्माचरणानें मलिन झालेलें त्या पातक्याचें अंतःकरण त्यामुळें शुद्ध होतें असें नाहीं. मात्र ईश्वराच्या चरणसेवेनें तें शुद्ध होतें ॥ १७ ॥ यमदूत हो, ज्याप्रमाणें समजून अथवा न समजूनहि टाकिलेला अग्नि काष्ठांना दग्ध करितो, त्याप्रमाणें अज्ञानानें उच्चारिलेलें जें पवित्रकीर्ति परमेश्वराचें नांव तें पुरुषांचीं पातकें दग्ध करितें ॥ १८ ॥ हे यमदूत हो, ज्याप्रमाणें अतिशय वीर्यवान् औषध यदृच्छेनें भक्षण केलें असतां त्याचे गुण न जाणणाऱ्या रोग्याला सुद्धां तें आपला गुण दाखवितें, त्याप्रमाणें उच्चारिलेला भगवन्नामात्मक मंत्रहि आपला गुण दाखवील ह्यांत संशय नाहीं ॥ १९ ॥

हें वृत्त सांगून शुकाचार्य म्हणाले,--हे राजा, ह्याप्रमाणें त्या विष्णुदूतांनीं भागवतधर्माचा चांगला निर्णय करून त्या ब्राह्मणाला यमपाशांतून मुक्त केलें व मृत्यूपासूनहि सोडविलें ॥ २० ॥ हे शत्रुदमना, ह्याप्रमाणें विष्णुदूतांनीं अडथळा केला असतां त्या यमदूतांनीं यमाजवळ जाऊन यमराजाला घडलेला सर्व वृत्तांत यथास्थितपणें सांगितला ॥ २१ ॥ इकडे यमपाशांतून मुक्त झाल्यामुळें निर्भय झालेला तो ब्राह्मण शुद्धीवर आला आणि विष्णुदूतांच्या दर्शनानें आनंदयुक्त होऊन त्यानें त्यांना मस्तकानें वंदन केलें ॥ २२ ॥ हे निष्पाप राजा, तेव्हां तो अजामिळ कांहीं तरी बोलण्याच्या बेतामध्यें आहेस असें जाणून त्याच्यासमक्ष विष्णुदूत त्या ठिकाणीं गुप्त झाले ॥ २३ ॥ यमदूतांच्या मुखानें वेदत्रयप्रतिपाद्य असा गुणाश्रयरूप धर्म व विष्णुदूतांच्या मुखांतून भगवत्प्रणीत असा निर्गुणधर्म श्रवण करून, श्रीहरीचें माहात्म्य श्रवण केल्यामुळें त्या अजामिळाची तत्काळ भगवंतावर भक्ति जडली. आपल्या पातकांचें स्मरण होऊं लागल्यामुळें त्याला मोठा पश्चात्ताप झाला व तो म्हणाला, ॥ २४ ॥ २५ ॥ अहो, इंद्रियदमन न करणाऱ्या माझी ही मोठीच हानि झाली. कारण, शूद्रीचे ठिकाणीं पुत्रत्वानें उत्पन्न होणाऱ्या मी, स्वतःचेंच आपलें ब्राह्मणत्व नाहींसें करून टाकिलें ॥ २६ ॥ अरेरे, आपल्या पतिव्रता

तरुण स्त्रीचा त्याग करून ज्यानें मद्यपान करणाऱ्या जारिणी स्त्रीशीं गमन केलें असा जो सज्जनांनीं निंदिलेला, व कुळाचा केवळ कलंक आणि पापाचरण करणारा असा जो मी, त्या मला धिक्कार असो ! ॥ २७ ॥ अहो, माझ्या मातापित्यांना मजवांचून कोणीहि आप्त नव्हता. तीं वृद्ध असून अनाथ होतीं आणि संसारतापानें संतप्त झालीं होतीं. अशा स्थितींत वेदाध्ययन करणाऱ्या त्यांचा मी कृतघ्नपणानें नीच पुरुषाप्रमाणें एकाएकीं त्याग केला ! ॥ २८ ॥ धर्म बुडविणाऱ्या कामीजनांना ज्या ठिकाणीं यमयातना प्राप्त होतात, या अतिभयंकर नरकामध्येंच मी खरोखर पडणार ! ॥ २९ ॥ पण हें आश्चर्य मी काय स्वप्नामध्यें पाहिलें कीं, जागेपणीं मला हें दिसलें ? जे पुरुष हस्तामध्यें पाश धारण करून मला ओढीत होते, ते आतां कोठें गेले ? ॥ ३० ॥ आणि मला पाशांनीं बांधून यमदूत भूमीच्या खालीं नरकांत घेऊन चालले असतां ज्यांनीं मला सोडविलें, ते दिसण्यांत सुंदर असलेले चार सिद्ध पुरुष आतां कोठें गेले ? ॥ ३१ ॥ असो. जरी मी ह्या जन्मीं पातकी आहें, तथापि जन्मांतरीं मी त्या सुरश्रेष्ठांच्या दर्शनाकरितां खरोखर कांहीं तरी पुण्य केलें असावें; कारण त्या पुण्याच्या योगानेंच माझें मन प्रसन्न होत आहे ॥ ३२ ॥ नाहीं तर, अपवित्र अशा शूद्र स्त्रीच्या नादीं लागलेल्या माझी जिव्हा या भगवन्नामाचा उच्चार करण्यास मरणसमयीं कशी योग्य झाली असती ? ॥ ३३ ॥ अहो, कपटी, पापी, ब्राह्मण्यनाशक आणि निर्लज्ज असा मी कोणीकडे व 'नारायण' असें मंगलकारक भगवन्नाम कोणीकडे ? ॥ ३४ ॥ यास्तव महापातकी असलेला हा मी, आतां फिरून ज्या रीतीनें अंधतम नरकामध्यें पडणार नाहीं, अशा रीतीनें, चित्त, दहा इन्द्रियें व प्राणवायु यांचा निग्रह करून योगसाधन करण्याविषयीं प्रयत्न करीन ॥ ३५ ॥ आणि अज्ञान व काम्य कर्म ह्यांपासून उत्पन्न झालेल्या ह्या सर्व संसारबंधाचा त्याग करून, मी सर्व भूतांचा सुहृत्, त्यांचें हित करणारा, शांत, दयाळू आणि इंद्रियदमन करणारा असा होईन ॥ ३६ ॥ जिनें मज अधमाला वानराप्रमाणें खेळविलें आहे, त्या स्त्रीरूपी ईश्वरमायेनें ग्रासलेल्या स्वतःला मी आतां मुक्त करून घेईन ॥ ३७ ॥ तसेंच मीं आपली बुद्धि सर्वस्वीं परमार्थाकडे लावून 'हा मी व हें माझें' अशा प्रकारच्या देहादिकांविषयींच्या अभिमानाचा त्याग करून, भगवंताच्या कीर्तनादिकांनीं शुद्ध झालेलें आपलें मन त्यावरच लावीन ॥ ३८ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले, --हे राजा, साधूंची संगति एक क्षणमात्रहि घडल्यामुळें अत्यंत वैराग्य उत्पन्न झालेला तो अजामिळ, पुत्रादिकांविषयींचा सर्व स्नेह सोडून त्या दासीच्या घरांतून निघून हरिद्वारास गेला ॥ ३९ ॥ आणि तेथें तो ब्राह्मण, देवाचा साक्षात्कार होणाऱ्या त्या क्षेत्रांत, योगमार्गाचा आश्रय करून आसनावर बसला व सर्व इंद्रियसमुदाय विषयापासून परावृत्त करून त्यानें आपले मन आत्मस्वरूपावर लाविलें ॥ ४० ॥ नंतर, देह व इंद्रियें इत्यादि गुणकार्यापासून त्यानें आपल्या मनाला पृथक् करून चित्ताच्या एकाग्रतेनें त्याला अनुभवात्मक अशा भगवत्स्वरूपी ब्रह्मावर लाविलें ॥ ४१ ॥ मग जेव्हां भगवत्स्वरूपावर त्याची बुद्धि निश्चल झाली, त्या वेळीं त्यानें आपल्या

अग्रभागीं विष्णुदूतांना अवलोकन केलें आणि पूर्वीं पाहिल्यामुळें ओळखून त्यानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला ॥ ४२ ॥ तसेंच त्यांच्या दर्शनानंतर तत्काळ त्यानें त्या गंगेच्या तीर्थामध्यें आपल्या देहाचा त्याग केला आणि भगवंताच्या पार्षदगणाचें रूप धारण केलें ॥ ४३ ॥ नंतर तो अजामिळ ब्राह्मण, विष्णुदूतांसहवर्तमान सुवर्णाच्या विमानामध्यें आरूढ होऊन ज्या ठिकाणीं श्रीपति विष्णु वास करितो, त्या वैकुंठामध्यें आकाशमार्गानें निघून गेला ॥ ४४ ॥ हे राजा, ज्यानें दासीपति होऊन सर्व धर्म बुडविले होते, जो निंद्य कर्मामुळें पतित झाला होता, जो व्रतापासून भ्रष्ट झाला होता आणि ज्याला यमदूत नरकामध्यें टाकीत होते, असाहि तो पतित झालेला अजामिळ याप्रमाणें अंतकाळीं भगवन्नामाचा उच्चार केल्यामुळें तत्क्षणीं यमपाशांतून मुक्त झाला ॥ ४५ ॥ तस्मात् ज्याच्या चरणाच्या ठिकाणीं तीर्थें आहेत, त्या भगवंताच्या कीर्तनाहून दुसरें मुमुक्षु जनांना पापवासनांचा उच्छेद करणारें असें कोणतेंहि श्रेष्ठ प्रायश्चित्त नाहीं. कारण, भगवत्कीर्तनावांचून इतर प्रायश्चित्तें केलीं असतांहि, मन, रज व तम यांच्या योगानें मलिनच राहतें; पण भगवन्नामसंकीर्तनानें मात्र तें मन कर्मावर फिरून कधींहि आसक्त होत नाहीं ॥ ४६ ॥ असो. याप्रमाणें हा पाप नाशक परम गुह्य इतिहास जो पुरुष श्रद्धेनें युक्त होऊन श्रवण करितो अथवा भक्तीनें कथन करितो, तो निःसंशय नरकाप्रत जात नाहीं. यमदूत त्याच्याकडे पाहातहि नाहींत; आणि जरी तो पातकी असला तरी तो विष्णुलोकींच विराजमान होतो ॥ ४७ ॥ ४८ ॥ हे राजा, अजामिळासारखा महापातकीसुद्धां मरतां मरतां पुत्रमिषानें हरिनामाचा उच्चार करून जर विष्णुलोकीं गेला, तर श्रद्धापूर्वक हरिनामाचा उच्चार करणाऱ्या पुरुषाला तें स्थान प्राप्त होईल ह्याविषयीं संशयच नको ! ॥ ४९ ॥

## दुसरा अध्याय समाप्त

---

# अध्याय ३ रा

परीक्षित्राजा म्हणाला,—हे मुने, याप्रमाणें आपल्या आज्ञेचा भंग झाला असतां, हे सर्व लोक ज्याच्या स्वाधीन आहेत असा तो देव धर्मराज, आपल्या दूतांनीं वर्णन केलेला वृत्तांत श्रवण करून विष्णुदूतांनीं ताडन करून परत पाठविलेल्या त्या दूतांना काय म्हणाला ? ॥ १॥ हे ऋषे, यमदेवाच्या आज्ञेचा भंग यापूर्वी कोणीं केलेला आम्हीं कधींहि ऐकिलेला नाहीं. आतां तर त्याच्या दूतांना सुद्धां अडथळा झाला. याविषयीं सर्व लोकांना असलेला संशय तुजवांचून दुसरा कोणीहि दूर करणार नाहीं, असा माझा निश्चय आहे. तरी याचें उत्तर तूंच मला सांग ॥ २ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, विष्णुदूतांनीं आपला प्रयत्न हाणून पाडला असतां त्या यमदूतांनीं संयमिनी नगरीचें परिपालन करणाऱ्या आपल्या यमनामक प्रभूजवळ जाऊन विज्ञापना केली ॥ ३ ॥

यमदूत म्हणाले,—हे प्रभो, पुण्य, पाप व मिश्र असें तीन प्रकारचें कर्म करणाऱ्या सर्व जीवांना त्यांच्या कर्माचें फळ देणारे असे शास्ते तरी ह्या त्रैलोक्यामध्यें खरोखर किती आहेत ? ॥ ४ ॥ हे प्रभो, लोकांमध्यें जर दंड धारण करणारे अनेक शास्ते असले, तर सुख आणि दुःख हीं कोणाला होतील व कोणाला होणार नाहींत या विषयींचा नियम कसा समजावा ? ॥५॥ हे प्रभो, अनेक कर्मकर्त्या पुरुषांसाठीं अनेक शास्ते असतील, तर सार्वभौम राजाकडे मुख्य शास्तृत्व असून मांडलिक राजांकडे जसा नांवाचाच अधिकार असतो, तसा ह्या जीवांचा जो मुख्य शास्ता असेल त्यांच्याकडेच खरें शास्तृत्व राहून इतरांकडे तें केवळ नाममात्रानेंच राहील ॥ ६ ॥ असो. ज्याअर्थीं ह्याप्रमाणें बहुनायकी संभवत नाहीं, त्या अर्थीं आमच्या मतें तर देवांसह सर्व प्राण्यांचा एकच अधिपति असा तूंच असून सर्व मनुष्यांच्या पुण्य-पापांचा निर्णय करणारा, शास्ता व दंड धारण करणाराहि तूंच आहेस ॥ ७ ॥ परंतु आज पाहावें तों, तूं केलेला दंड लोकांमध्यें चालत नाहीं; कारण, चार अद्भुत सिद्धांनीं तुझ्या आज्ञेचें नुकतेंच उल्लंघन केलें आहे ॥८॥ तुझ्या आज्ञेप्रमाणें आम्हीं पातकी अजामिळाला यातनागृहामध्यें घेऊन चाललों असतां, चार सिद्ध पुरुषांनीं येऊन बलात्कारानें त्याचे पाश तोडून त्याला सोडविलें ॥ ९ ॥ यास्तव तुजपासून आमचें हित व्हावें असें जर तूं मानीत असशील, तर त्या पातकी अजामिळानें, ‘ नारायण ’ असें म्हणतांक्षणींच ‘ भिऊं नको ! ’ असें म्हणत म्हणत त्याच्या समीप जे सत्वर आले ते महाप्रभावशाली कोण होते, हें तुजपासून जाणण्याची आमची इच्छा आहे ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणाले,——हे राजा, प्रजांचें संयमन करणाऱ्या त्या यमदेवाला ह्याप्रमाणें दूतांनीं प्रश्न केला असतां, तो प्रसन्न झाला आणि श्रीहरीच्या चरणकमळाचें स्मरण करीत तो आपल्या दूतांना म्हणाला ॥ ११ ॥

यम म्हणाला,—दूत हो, उभ्या व आडव्या तंतूंनीं विणलेल्या वस्त्राप्रमाणें ज्याच्या· ठिकाणीं हें विश्व ओतप्रोत भरलेलें आहे, ज्याच्यापासून विष्णु, ब्रह्मा व रुद्र उत्पन्न होऊन ह्या विश्वाची स्थिति, उत्पत्ति व लय हीं होतात आणि वेसण घातलेल्या बैलाप्रमाणें हे सर्व लोक ज्याच्या स्वाधीन आहेत, असा तो स्थावरजंगमांचा मुख्य अधिकारी स्वामी माझ्याहून वेगळाच आहे ॥१२॥ अहो,ज्याप्रमाणें शेतकरी लोक दाव्यांनीं बैलांना दावणीला बांधतात, त्याप्रमाणें तो आपल्या वेदवाणीरूप दावणीला ब्राह्मणादि नांवांनीं लोकांना बांधून टाकितो व नामकर्मरूपबंधांनीं बद्ध होऊन भयभीत झालेले हे सर्व जीव त्याच्या आधीन असून आपआपलीं कर्में करितात ॥ १३ ॥ इतरांची तर गोष्ट पाहिजे कशाला ! परंतु, मी यम, महेंद्र, निर्ऋति, वरुण, चंद्र, अग्नि, शंकर, वायु, सूर्य, ब्रह्मदेव, द्वादशादित्य, विश्वेदेव, अष्टवसु, साध्य, मरुद्गण, सिद्धांसह रुद्रगण, तसेंच इतर जे मरीचिप्रभृति प्रजापति आहेत, ते व बृहस्पति आदिकरून देव आणि रजोगुण व तमोगुण यांचा स्पर्शहि नसल्यामुळें सत्त्वगुणच ज्यांच्यामध्यें मुख्य आहे असे भृग्वादि ऋषि, हेहि मायेनें मोहित झाल्यामुळें त्यांची लीला जाणत नाहींत ॥१४॥ १५ ॥ आणि जसे तांबड्या, काळ्या वगैरे रंगांनीं युक्त असलेले रूपवान् पदार्थ आपणांस पाहणाऱ्या व आपणांहून निराळ्या अशा नेत्रेंद्रियाला पाहात नाहींत त्याप्रमाणें सर्वहि प्राणी आपल्या हृदयामध्यें असलेल्या त्या आपल्या द्रष्ट्याला इंद्रियें, मन, प्राण, चित्त अथवा वाणी, ह्यांच्या योगेंकरून जाणत नाहींत; असा तो परमेश्वर माझ्याहून निराळाच आहे ॥ १६ ॥ हे दूत हो, स्वतंत्र, सर्वोत्कृष्ट, सर्वेश्वर, मायाधिपति आणि महात्मा, असा जो श्रीहरि त्याचे दूत, प्रायश: या त्रैलोक्यामध्यें संचार करीत असतात व दिसण्यांत ते मनोहर असून त्यांचें रूप, गुण व स्वभाव हे श्रीहरीसारखेच असतात ॥ १७ ॥ ते देवांनाहि पूज्य असून त्यांची रूपें अवलोकन करण्यासहि अशक्य आहेत. ते अत्यंत अलौकिक असे विष्णुदूत विष्णूची भक्ति करणाऱ्या मनुष्यांचें माझ्या हातून, शत्रूंपासून व अग्नि इत्यादिकांपासून सर्व ठिकाणीं रक्षण करितात ॥ १८ ॥ हे दूत हो, साक्षात् भगवंतानें सांगितलेला हा धर्म तर ऋषि, देव, सिद्धांतील मुख्य, असुर आणि मनुष्य, हे सुद्धां जाणत नाहींत, मग विद्याधर आणि चारण इत्यादि कोठून जाणणार ? ॥ १९ ॥ हे योद्धे हो, ब्रह्मदेव, नारद, शंकर, सनत्कुमार, कपिल, मनु, प्रल्हाद, जनक, भीष्म, बलि, शुक व मी असे आम्ही बारा जण मात्र हा गुह्य, अत्यंत शुद्ध आणि दुर्बोध असा भगवंतानें सांगितलेला धर्म जाणतों. त्या धर्माचें महत्त्व इतकें आहे कीं, तो केवळ जाणला असतांहि मोक्ष प्राप्त होतो, मग आचरण केला असतां मोक्ष प्राप्त होईल ह्यांत आश्चर्य काय ? ॥ २० ॥ २१ ॥ अहो, भगवंताच्या नामोच्चारणादिकांनीं त्याच्यावर भक्ति करणें, इतकाच पुरुषांचा या मनुष्यलोकीं श्रेष्ठ धर्म सांगितला आहे ॥ २२ ॥ वत्स हो, पुत्राला ठेवलेल्या नामाच्या केवळ एकवार उच्चारानें अजामिळ सुद्धां मृत्युपाशांतून मुक्त झाला, असें हें हरिनामोच्चारणमाहात्म्य आहे पाहा ॥ २३ ॥ दूत हो, भगवंताच्या गुणांचें, कर्मांचें व नामांचें उत्तम प्रकारें कीर्तन करणें, ह्या एवढ्या मोठ्या साधनांचाहि पुरुषांच्या पापाचा नाश करण्याकरितां उपयोग करण्याची गरज नाहीं.

कारण महापातकी अजामिळ मरणदु:खानें विवश झाला असतांहि केवळ 'नारायण' असा पुत्रांकरितां आक्रोश करूनहि मुक्त झाला ॥२४॥ दूत हो, हे मनुप्रभृति मोठमोठाले लोक प्रायश: हे हरिनाममाहात्म्य जाणत नाहींत; म्हणूनच ते पापक्षयार्थ द्वादशाब्दादि प्रायश्चित्तें सांगतात व मायादेवीनें त्यांच्या बुद्धीस अत्यंत मोह पाडल्यामुळें श्रवण करणाऱ्यास मधुर लागेल अशा रीतीनें फुललेल्या अर्थवादांनीं मनोहर असलेल्या तिन्ही वेदांमध्यें त्यांची बुद्धि आग्रह धरिते; आणि त्यामुळें यज्ञासारख्या विस्तारयुक्त कर्मामध्येंच ते श्रद्धापूर्वक प्रवृत्त होऊन हरिनामोच्चारणासारख्या साधनांकडे दुर्लक्ष करतात ॥२५॥ असो. विचार करून जे ज्ञानवान् लोक खरोखर एकाग्रमनानें अविनाशी भगवंताची भक्ति करीत असतात, त्यांना मजपासून दंड होणें योग्य नाहीं. कारण, त्यांच्या ठिकाणीं पातक नसतेंच व जरी कदाचित् असलें तरी त्याचाहि महाकीर्तिमान् परमेश्वराच्या नामसंकीर्तनानेंच नाश होतो ॥२६॥ असो. याप्रमाणें धर्मतत्त्वाचा निर्णय करून यमधर्मानें आपल्या दूतांना सांगितलें कीं, जे समदृष्टि साधुलोक भगवंताला शरण गेलेले असतात, त्यांच्या पवित्र कथांचें वर्णन देव व सिद्ध करीत असतात. तस्मात् श्रीहरीच्या गदेनें चोहोंकडून रक्षण केलेल्या साधूंच्या समीप देखील तुम्ही कधीं जाऊं नका ! कारण त्यांना दंड करण्यास आम्ही व प्रत्यक्ष कालहि समर्थ नाहीं ॥ २७ ॥ दूत हो, सर्वसंगपरित्याग केलेल्या रसज्ञ परमहंसगणांनीं निरंतर सेवन केलेल्या भगवंताच्या चरणकमळांतील मकरंदरूप रसाकडे पाठ फिरवून नरकाचा मार्गच कीं काय, अशा आपल्या स्वधर्मशून्य घरामध्यें जे आशेची कास धरून बसतात, त्या दुष्ट लोकांना मात्र तुम्ही येथें आणीत जा ! ॥ २८ ॥ ज्यांची जिव्हा एकदांही भगवंताच्या गुणयुक्त नामाचा उच्चार करीत नाहीं, ज्यांचें मन कधींहि त्याच्या चरणारविंदाचें स्मरण करीत नाहीं; आणि ज्याचें मस्तक एकदांसुद्धां श्रीकृष्णाच्या चरणांवर नम्र होत नाहीं; असे जे कोणी भगवत्सेवा न करणारे दुष्ट असतील त्यांनाच तुम्ही येथें आणीत जा ॥२९॥ असो. ज्या अर्थी माझ्या दूतांनींच अन्यायाचें वर्तन केलें, त्या अर्थी षड्गुणैश्वर्यसंपन्न असा तो पुराणपुरुष नारायण, आपण होऊन तें सहन करो. कारण, हात जोडून असलेल्या आम्हां अज्ञ स्वभक्तांना क्षमा करणें, हेंच त्या सर्वश्रेष्ठ परमेश्वराला योग्य आहे. ह्या सर्वव्यापी व सर्वांतर्यामी परमेश्वराला नमस्कार असो ॥ ३० हे कुरुकुलोत्पन्न राजा, याप्रमाणें जगन्मंगलरूप असें विष्णूचें जें नामसंकीर्तन तेंच मोठमोठ्या पातकांचेंहि सर्वोत्कृष्ट प्रायश्चित्त आहे असें समज ॥३१॥ कारण श्रीहरीचे अमर्याद पराक्रम वारंवार श्रवण करणाऱ्या व पठण करणाऱ्या पुरुषांचें अंतःकरण अनायासानें उत्पन्न झालेल्या भक्तीच्या योगानेंच जसें शुद्ध होतें, तसें तें व्रतादिकांच्या योगानें शुद्ध होत नाहीं ॥ ३२ ॥ जो पुरुष श्रीकृष्णाच्या चरणकमळांतील मकरंदाचा स्वाद घेणारा आहे, तो अतितुच्छ म्हणून टाकिलेल्या दु:खप्रद अशा विषयांत फिरून कधींहि रममाण होत नाहीं आणि त्या मकरंदाचा आस्वाद न घेणारा व विषयवासनांनीं घेरलेला असा जो दुसरा असतो तो आपल्या पातकांचें परिमार्जन करण्याकरितांहि पुन: प्रायश्चित्तरूप कर्मच करितो व त्या कर्मापासून पातकच उत्पन्न होतें ॥ ३३ ॥ राजा, याप्रमाणें आपल्या प्रभूनें

निवेदन केलेलें भगवन्माहात्म्य श्रवण करून त्या यमदूताच्या मनाला विस्मय न वाटतां ' हें सांगितलेलें मर्म खरें आहे, असें ते मानूं लागले व तेव्हापासून ' हा आमचाच घात करील," अशी भीति बाळगून, श्रीविष्णूच्या आश्रयानें राहिलेल्या लोकांकडे ते यमदूत पाहत देखील नाहींसे झाले ॥ ३४ हे राजा, हा गुह्य इतिहास पूर्वीं मलयपर्वतावर बसून एकाग्र अन्तःकरणपूर्वक श्रीहरीचें अर्चन करणाऱ्या भगवान् अगस्त्यऋषीनें मला कथन केला होता ॥ ३५ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

---

# अध्याय ४ था

राजा म्हणाला,—हे भगवन्, देव, असुर, मनुष्य, नाग, पशु आणि पक्षी, ह्यांची जी स्वायंभुवमन्वंतरांत झालेली सृष्टि तूं संक्षेपानें पूर्वीं मला कथन केलीस तिचा विस्तार आणि मायातीत भगवंतानें ज्या शक्तीनें व ज्या प्रकारानें पुढील सृष्टि उत्पन्न केली ती शक्ति व तो प्रकार, हीं तुम्हांपासून जाणण्याची मी इच्छा करितों ॥ १ ॥ २ ॥

सूत म्हणाले,—शौनकमुनि हो, याप्रमाणें परीक्षित् राजर्षीनें केलेला उत्तम प्रश्न श्रवण करून, महायोगी ऋषिश्रेष्ठ श्रीशुकाचार्य त्याची प्रशंसा करून त्याला उत्तर देऊं लागले ॥ ३ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले,—हे राजा, जेव्हां प्राचीन बर्हिराजाच्या प्रचेतसनामक दहा पुत्रांनीं समुद्रांतून बाहेर येऊन वृक्षांनीं व्याप्त झालेली पृथ्वी अवलोकन केली ॥ ४ ॥ तेव्हां तपश्चर्येमुळें त्यांचा कोप प्रदीप्त होऊन, ते वृक्षांवर क्रुद्ध झाले आणि त्यांना दग्ध करण्याच्या इच्छेनें त्यांनीं आपल्या मुखांतून वायु आणि अग्नि हे उत्पन्न केले ॥५॥ नंतर, हे कुरुश्रेष्ठा, त्या वायूच्या व अग्नीच्या योगानें दग्ध होऊं लागलेल्या त्या वृक्षांना अवलोकन करून त्या वृक्षांचा सोमनामक राजा, त्या प्रजेत्यांचा कोप शांत करण्यासाठीं त्यांना म्हणाला, ॥ ६ ॥ हे महाभाग्यवंत प्रचेते हो, तुम्ही सर्व प्रजांचे अधिपति असून त्यांची वृद्धि करण्याची इच्छा करणारे आहां. यास्तव त्या दीन वृक्षांचा द्रोह करणें तुम्हांला योग्य नाहीं ॥ ७ ॥ अहो, प्रजापालकांचा अधिपति जो अविनाशी भगवान् प्रभु श्रीहरि, त्यानें वनस्पतिरूपानें भक्ष्य व ओषधिरूपानें अन्न हीं उत्पन्न केलीं आहेत ॥ ८ ॥ तसेंच पक्ष्यांनीं संचार करणाऱ्या पक्ष्यांचें अन्न अचल असें पुष्पफलादि होय. पादचारी गाई आदिकरून प्राण्यांचें अन्न पादरहित असें तृणादि होत. हस्त असलेल्या प्राण्यांचें हस्तरहित असे मृगादि पशु होत आणि दोन पायांनीं युक्त असलेल्या मनुष्यांचें अन्न चतुष्पाद पशु; हे श्रीहरीनेंच उत्पन्न केलें आहे ॥ ९॥ हे निष्पाप प्रचेते हो, यास्तव तुमच्या पित्यानें व देवाधिदेव ब्रह्मदेवानें प्रजोत्पत्तीकरितां तुम्हांला आज्ञा केली असतां, वृक्षांना दग्ध करणें हें तुम्हांला कसें बरें योग्य होईल ? ॥ १० ॥ ह्याकरितां तुमच्या पित्यानें, पितामहानें व प्रपितामहांनीं सुद्धां सेवन केलेल्या अशा सन्मार्गाचा तुम्ही आश्रय करा, आणि वृद्धिंगत झालेला हा आपला कोप शांत करा ! ॥ ११ ॥ हे प्रचेते हो, बाळकांचें रक्षण करणारे जसे मातापितरच आहेत, नेत्रांचें रक्षण करणाऱ्या जशा पापण्याच आहेत, स्त्रीचा रक्षक व पोषक जसा पतिच आहे, भिक्षूंचा आधार जसा गृहस्थच आहे, आणि अज्ञ जनांचा सुहृद् जसा ज्ञानोपदेश करणारा ज्ञानीच आहे, त्याप्रमाणें प्रजाजनांचें रक्षण करणारे तुमच्यासारखे प्रजापतीच होत ॥ १२ ॥ प्राण्यांच्या देहामध्यें अंतर्यामिरूपानें समर्थ हरिच वास करीत असतो, यास्तव सर्व

चराचर विश्व त्याचेंच निवासस्थान आहे, हें तुम्ही लक्षांत घ्या. याच रीतीनें तुम्हीं त्याला पूर्वीं संतुष्ट केलें होतें ॥ १३ ॥ हे प्रचेते हो, देहामध्यें हृदयाकाशापासून अकस्मात् उत्पन्न झालेल्या भयंकर क्रोधाचें आत्मविचारानें जो संयमन करितो, तोच तिन्ही गुणांच्या पलीकडे जाऊन भगवत्स्वरूपास प्राप्त होतो ॥ १४ ॥ यास्तव हे दीन वृक्ष दग्ध झाले तितके पुरे. अवशिष्ट राहिलेल्या वृक्षांचें व तुमचें कल्याण असो आणि वृक्षांनीं पालन केलेल्या व तुम्ही वरण्यास योग्य अशा ह्या कन्येचा तुम्हीं पत्नी ह्या नात्यानें स्वीकार करा ॥ १५ ॥ हे परीक्षित्‌राजा, याप्रमाणें प्रचेत्याचें सांत्वन करून आणि सर्वोत्कृष्ट नितंबप्रदेशानें युक्त असलेली ती प्रम्लोचा नामक अप्सरेची कन्या त्यांना अर्पण करून सोमराजानें तेथून गमन केलें व त्या प्रचेत्यांनींहि धर्मविधीनें तिच्याशीं विवाह करून घेतला ॥ १६ ॥ पुढें त्यांच्यापासून त्या प्रम्लोचानामक अप्सरेच्या पोटीं प्राचेतस म्हणून प्रसिद्ध असा दक्षनामक पुत्र जन्मास आला आणि त्यापासून झालेल्या प्रजेनेंच हें त्रैलोक्य भरून गेलें ॥ १७ ॥ आतां कन्यांवर प्रेम करणाऱ्या त्या दक्षानें वीर्यद्वारां व मनोद्वारां प्राणी कसे उत्पन्न केले, तें तूं सावधपणानें मजपासून श्रवण कर. ॥ १८ ॥ हे राजा, आकाश, भूमि व जल ह्यांमध्यें राहणाऱ्या ह्या देव, असुर व मनुष्य इत्यादि प्रजा दक्षप्रजापतीनें पूर्वी मनोमात्रेंकरूनच उत्पन्न केल्या ॥ १९ ॥ परंतु ती प्रजासृष्टि वृद्धिंगत होईना असें अवलोकन करून त्या दक्षप्रजापतीनें विंध्याचळाजवळील एका पर्वतावर जाऊन दुष्कर तपश्चर्या केली ॥ २० ॥ त्या ठिकाणीं पापनाशक असें एक अघमर्षणनामक सर्वोत्कृष्ट तीर्थ आहे. त्यामध्यें त्या दक्षानें त्रिकाळ स्नान करून तपाच्या योगानें श्रीहरीला संतुष्ट केलें ॥ २१ ॥ हे राजा, ज्या हंसगुह्यनामक स्तोत्रानें अधोक्षज भगवंताची दक्षप्रजापतीनें स्तुति केली, व ज्याच्या योगानें श्रीहरि त्याच्यावर संतुष्ट झाला, तें स्तोत्र तुला मी कथन करितों ॥ २२ ॥

दक्षप्रजापति म्हणाला,—ज्याची चिच्छक्ति सत्य असल्यामुळें, जो जीव आणि माया ह्यांचा नियंता आहे, ज्याच्यापासून प्रत्यक्षादि प्रमाणें माघारीं फिरलीं असल्यामुळें विषयांनाच परमार्थ समजणाऱ्या जीवांना ज्याचें स्वरूप कळून येत नाहीं; ज्याच्या कालाची सीमा नाहीं, अशा त्या स्वयंप्रकाश सर्वोत्कृष्ट परमात्म्याला मी नमस्कार करितों ॥ २३ ॥ रूपादि विषयांना इंद्रियादिकांचें प्रकाशकत्व समजत नाहीं, त्याप्रमाणें ह्या देहामध्यें वास करणारा अंतर्यामी जीवरूपी मित्र देखील, तेथेंच वास करीत असलेल्या व प्रपंचाचा साक्षी अशा आपल्या ईश्वररूपी मित्राचें सख्य जाणत नाहीं. अशा त्या महेश्वराला नमस्कार असो ॥ २४ ॥ देह, प्राण, इंद्रियें, अंतःकरणें, महाभूतें व त्यांचीं सूक्ष्म रूपें, हीं आपल्या स्वरूपाला, इंद्रियसमूहाला व ह्या दोहोंच्याहि पलीकडे असलेल्या देवतावर्गाला जाणत नाहींत. जीव ह्या तिघांनाहि जाणतो व ह्यांना कारणीभूत असलेले गुणहि त्याला माहीत आहेत; परंतु तोहि त्या सर्वज्ञ परमेश्वराला जाणत नाहीं, अशा त्या अनंताचें मी स्तवन करितों ॥ २५ ॥ दर्शन व स्मरण यांचा नाश झाल्यामुळें, ज्या काळीं नामरूपाचें ज्ञान करून देणाऱ्या मनाची समाधि लागत्ये, त्या वेळीं केवळ स्वरूपज्ञानानेंच

जो प्रतीत होतो व शुद्ध मन हेंच ज्याच्या साक्षात्काराचें साधन आहे, त्या शुद्धस्वरूप परमात्म्याला नमस्कार असो ॥ २६ ॥ सामिधेनीनामक पंधरा मंत्रांनीं प्रकाशमान होणाऱ्या काष्ठांतील अलौकिक अग्नीला, याज्ञिक लोक जसें मंथनानें पृथक् करून काढितात, त्याप्रमाणें हृदयामध्यें निश्चल केलेल्या व सत्तावीस तत्त्वरूप आपल्या शक्तिभूत उपाधींनीं प्रकाशमान नसलेल्या, ज्या अठ्ठाविसाव्यांचें स्वबुद्धीनें विवेचन करून विवेकी लोक ध्यान करितात आणि सर्व भेदांनीं परिपूर्ण असलेल्या मायेचा त्याग केल्यामुळें प्राप्त झालेल्या मुक्तिसुखामध्यें ज्याचा अनुभव येतो, जो सर्व नांवांना आणि सूक्तांना पात्र आहे आणि ज्याच्या स्वरूपीं मायारूप अचिंत्यशक्ति आहे, तो परमात्मा मजवर प्रसन्न होवो ॥ २७ ॥ २८ ॥ जें जें वाणीनें केलेलें, बुद्धीनें ठरविलेलें, इंद्रियांनीं करविलेलें अथवा मनानें संकल्पिलेलें आहे, तें स्वयंप्रकाश अशा परमात्म्याचें रूप होय; आणि सचेतन अधिष्ठान असल्यावांचून गुणांचा लय व उत्पत्ति हीं संभवत नाहींत. ह्याकरितां, गुणांचा लय व उत्पति यांच्या योगानें ज्याचें अनुमान होतें, तो परमेश्वर गुणांहून वेगळा आहे ॥ २९ ॥ ज्याच्याकरितां, ज्याच्यापासून व ज्याच्या योगानें, ज्यासंबंधीं, ज्याच्या ठिकाणीं, जें जें कांहीं जो जो करतो किंवा करावयास लाविला जातो, तें सर्वांच्या आधीं असलेलें ब्रह्मच होय. तें श्रेष्ठ व कनिष्ठ अशा सर्व कारणांचें तें कारण असून सजातीय व विजातीय भेदशून्य व निरपेक्ष आहे ॥ ३० ॥ माया, अविद्या इत्यादि ज्यांच्या शक्ति वाद करणाऱ्या लोकांच्या विवादांचा आणि कधीं कधीं संवादांचा विषय होऊन त्यांच्या मनाला वारंवार मोह उत्पन्न करितात, त्या सर्वव्यापी अनंतगुण परमात्म्याला नमस्कार असो ॥ ३१ ॥ योग या उपासनाशास्त्रामध्यें पाताळ हें देवाच्या पायाचा तळ आहे व सत्यलोक त्याचें मस्तक आहे, असें त्याच्या विराट्रूपाचें वर्णन असतें; आणि सांख्यनामक ज्ञानशास्त्रांत ब्रह्माला पादादि अवयव नाहींत असें म्हटलेलें असतें. अशा रीतीनें या शास्त्रांत निरनिराळे व परस्परविरुद्ध असें मर्म सांगून एकाच वस्तूचें प्रतिपादन केलेलें असतें. त्यांत विवादविषयाहून निराळें आणि विवादाला अधिष्ठानभूत असें जें कांहीं दोघांनाहि समान असें असतें, तेंच सर्वव्यापी ब्रह्म होय. त्या ब्रह्माला नमस्कार असो ॥ ३२ ॥ तें नामरूप यांनीं रहित असतांहि, ज्या अचिंत्य ऐश्वर्यांनीं युक्त असलेल्या अनंत परमात्म्यानें, आपल्या चरणकमलाची सेवा करणाऱ्या लोकांवर अनुग्रह करण्याकरितां अवतार घेऊन आणि दुष्टांचा पराभव करून नांवें व रूपें धारण केलीं, तो परमेश्वर मजवर प्रसन्न होवो ॥ ३३ ॥ ज्याप्रमाणें वायु चंपकादिक अनेक सुगंधि पुष्पांचा आश्रय करून नाना प्रकारच्या गंधांनीं युक्त असल्यासारखा भासतो, त्याचप्रमाणें तो अंतर्यामी ईश्वर अर्वाचीन ज्ञानमार्गातील भक्तांच्या इच्छेनुसार अनेक देवतारूपानें भासमान होतो, तो माझा मनोरथ सत्य करो ॥ ३४ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे कुरुश्रेष्ठा, त्या अघमर्षणनामक तीर्थाच्या ठिकाणीं दक्षानें याप्रमाणें स्तुति केली असतां, तो भक्तवत्सल भगवान् उत्तम स्तुति करणाऱ्या त्या दक्षाच्या पुढें प्रगट झाला ॥ ३५ ॥ हे राजा, त्यानें आपले पाय गरुडाच्या स्कंधावर ठेविले.

होते, त्याला लांबलांब आठ हात होते व त्यांत त्यानें चक्र, शंख, खड्ग, ढाल, बाण, धनुष्य, पाश व गदा अशीं आठ आयुधें धारण केलीं होतीं ॥ ३६ ॥ त्यानें पीतांबर परिधान केला होता, व त्याचा वर्ण मेघासारखा श्यामवर्ण होता. त्याचें मुख व नेत्र प्रसन्न असून त्याचें शरीर वनमालेच्या योगानें कंठापासून तों पायांपर्यंत सुशोभित झालें होतें, आणि त्याच्या कंठांत श्रीवत्सलांछन व कौस्तुभमणि हे झळकत होते ॥ ३७ ॥ त्यानें मस्तकावर मोठा मुकुट घातला असून हातांमध्यें मोठमोठे कडीतोडे घातले होते. चकचकणारीं मकराकृति कुंडलें त्यानें कानांत घातलीं असून, कटिसूत्र, आंगठ्या, साखळ्या व तोरड्या आणि बाहुभूषणें ह्यांनीं त्याचें शरीर भूषित झालें होतें ॥ ३८ ॥ भगवंतानें तें श्रीपुरुषोत्तमनामक रूप धारण केलें असून, इंद्रादि लोकपाल, नारद व नंद इत्यादि पार्षदगण त्याच्या भोंवतीं उभे होते आणि सिद्ध, गंधर्व व चारण हे त्याच्या मागें उभे राहून त्याची स्तुति गात होते ॥ ३९ ॥ असें तें अत्यंत आश्चर्यकारक रूप अवलोकन केल्यावर दक्षप्रजापतीच्या मनाला फारच आनंद होऊन तो अगदीं गोंधळून गेला, व त्यानें भूमीवर पडून दंडासारखा त्याला प्रणाम केला ॥ ४० ॥ नंतर अनेक प्रवाहांमुळें जशा नद्या भरून जातात, त्याप्रमाणें तीव्र आनंदाच्या योगानें त्याचीं इंद्रियें अगदीं भरून गेलीं व त्या दक्षप्रजापतीच्या तोंडून शब्द निघत नाहींसा झाला ॥ ४१ ॥ तथापि सर्व भूतांचें हृद्गत जाणणारा भगवान् जनार्दन अशा रीतीनें नम्र झालेल्या आपल्या प्रजोत्पादनेच्छु भक्ताशीं आपण होऊनच बोलूं लागला ॥ ४२ ॥

श्रीभगवान् म्हणाला, हे महाभाग्यवान् प्रचेतसपुत्रा, तूं तपाच्या योगानें चांगला सिद्ध झाला आहेस. कारण मजविषयीं उत्कट श्रद्धा धरिल्यामुळें माझे ठिकाणीं तुझी उत्कृष्ट भक्ति जडली आहे ॥ ४३ ॥ हे प्रजापते दक्षा, तुझें तप ह्या विश्वाची वृद्धि करण्यासाठींच झाल्यामुळें मी तुजवर प्रसन्न झालों आहें. हे प्रजापते, प्राण्यांची वृद्धि व्हावी, हीच माझी इच्छा असून ती तुझ्या तपानें परिपूर्ण होणार असल्यामुळें मी प्रसन्न झालों आहें ॥ ४४ ॥ लोकविभूतींचा विस्तार करण्याचा तुझा प्रयत्नहि उचितच आहे. कारण, ब्रह्मा, रुद्र, तुम्ही प्रजापति, मनु व इंद्रादिदेव ह्या सर्व माझ्याच विभूति असून भूतांच्या उत्पत्तीला त्या सर्व कारण आहेत ॥ ४५ ॥ हे ब्रह्मनिष्ठा, तप हें माझें हृदय, विद्या ही माझें शरीर, क्रिया हा माझा आकार, उत्तमप्रकारें निष्पाप झालेले यज्ञ हे माझे अवयव, धर्म हें माझें धन आणि देव हे माझे प्राण आहेत ॥ ४६ ॥ सृष्टीच्या पूर्वी मी एकटाच होतों. तेथें ग्राहक अथवा ग्राह्य अशी कांहीं एक अन्य वस्तु नसून केवळ चैतन्य मात्र होतें; आणि तेंहि व्यक्त नसल्यामुळें सर्वत्र स्वस्थ व निद्रिस्त असल्यासारखें होतें ॥ ४७ ॥ पुढें अनंतगुणांनीं युक्त असलेल्या मज अनंताच्या ठिकाणीं जेव्हां मायेच्या योगानें गुणमय ब्रह्मांडरूप देह उत्पन्न झाला, तेव्हांच अयोनिसंभव असा आद्य ब्रह्मदेव उत्पन्न झाला ॥ ४८ ॥ नंतर माझ्या सामर्थ्यानें युक्त होऊन सृष्टि उत्पन्न करण्याकरितां उद्युक्त झालेल्या त्या सुरश्रेष्ठाला जेव्हां सृष्टि उत्पन्न करण्यास आपण असमर्थ आहों असें वाटूं लागलें, तेव्हां 'तप कर!' म्हणून मी त्याला उपदेश केला.

त्याप्रमाणें त्या समर्थ ब्रह्मदेवानें उग्र तप करून त्याच्या योगानें तुम्हां नऊ प्रजापतींना प्रथम उत्पन्न केलें ॥ ४९ ॥ ५० ॥ हे प्रजाधिपते दक्षा, पंचजननामक प्रजापतीच्या ह्या असिक्नीनामक कन्येचा तूं आतां पत्नी या नात्यानें स्वीकार कर ॥ ५१ ॥ म्हणजे स्त्रीपुरुषसंबंधीं रतिरूपधर्मानें युक्त असा तूं, त्याच प्रकारच्या धर्मानें युक्त असलेल्या त्या भार्येच्या ठिकाणीं फिरून बहुतप्रकारची प्रजासृष्टि उत्पन्न करिशील ॥ ५२ ॥ नंतर तुझ्या पुढील सर्व प्रजा, माझ्या मायेच्या योगानें स्त्रीपुरुषसंबंधापासूनच पुत्रादिरूपानें उत्पन्न होतील व माझें पूजन करतील ॥ ५३ ॥

शुकाचार्य म्हणाले,— हे परीक्षित्‌राजा, विश्ववर्धक असा भगवान् श्रीहरि, याप्रमाणें भाषण करून त्या दक्षप्रजापतीसमक्ष स्वप्नामध्यें दिसलेल्या वस्तूप्रमाणें त्याच ठिकाणीं अंतर्धान पावला ॥ ५४ ॥

## चौथा अध्याय समाप्त

---

# अध्याय ५ वा

शुकाचार्य म्हणाले, —हे राजा, नंतर विष्णूच्या मायाशक्तीमुळें उत्कर्ष पावलेल्या त्या समर्थ दक्षाची भार्या, पंचजनप्रजापतीची कन्या जी असिक्नी तिजपासून हर्यश्वनामक दहा हजार पुत्र उत्पन्न झाले ॥ १ ॥ हे राजा, त्या दक्षाच्या सर्व पुत्रांचा आचार व स्वभाव हे सारखेच होते आणि संतति उत्पन्न करण्याविषयीं त्यांना पित्यानें आज्ञा केली असतां, ते भगवंताचें आराधन करावें म्हणून पश्चिम दिशेस निघून गेले ॥ २ ॥ त्या पश्चिम दिशेस सिंधुनदी व समुद्र यांचा जेथें संगम झाला आहे, तेथें मुनि व सिद्ध यांनीं सेवन केलेलें नारायणसरोवरनामक अतिविस्तीर्ण तीर्थ आहे ॥ ३ ॥ त्या तीर्थांत स्नान करतांच त्या हर्यश्वांच्या अंत:करणांतील विषयवासनांचे मळ अगदीं नाहींसे झाले आणि त्यांना परमहंसधर्माचा स्वीकार करण्याची उत्कट बुद्धि उत्पन्न झाली ॥ ४ ॥ तेव्हां पित्याच्या आज्ञेनें निरुपाय झालेल्या त्या हर्यश्वांनीं आपलें उग्र तप चालू ठेविलें असतां, प्रजेच्या वृद्धीकरितां उद्युक्त झालेल्या त्या हर्यश्वांची देवर्षि नारदानें एकदां भेट घेतली ॥ ५ ॥ नारद त्यांना म्हणाला, — हे हर्यश्व हो, भूमीचा अंत पाहिल्याशिवाय प्रजापालक असतांहि अज्ञानामुळें तुम्हांला संतति कशी उत्पन्न करितां येईल ? ॥ ६ ॥ त्याचप्रमाणें ज्यांत एकच पुरुष आहे असें राष्ट्र, जेथून बाहेर पडण्याला मार्गच दृष्टीस पडत नाहीं असें बिळ, अनेक रूपें घेणारी स्त्री, जारिणीचा पति असा पुरुष, दोहोंकडून वाहणारी नदी, पंचवीस पदार्थांचें अद्‌भुत घर, विचित्र कथा सांगणारा हंस आणि वस्तरे व वज्र यांनीं निर्माण केलेलें अतितीक्ष्ण व वज्राप्रमाणें दृढ असें स्वयं भ्रमण करणारें चक्र, या वस्तूंचें ज्ञान करून घेतल्याशिवाय, आपल्या सर्वज्ञ पित्याची आज्ञा खरोखर काय आहे, हें न जाणतां तुम्ही संतति कशी उत्पन्न कराल ? ॥ ७ ॥ ८ ॥ ९ ॥

शुकाचार्य म्हणाले, —हे परीक्षित्‌राजा, हर्यश्वांनीं तें भाषण ऐकिलें असतां त्यांची बुद्धि स्वाभाविकपणें विचारशक्तीनें युक्त असल्यामुळें नारदाच्या भाषणांतील कोड्याचा त्यांनीं स्वत:च विचार केला ॥ १० ॥ भू म्हणजे आपल्या अनादिबंधास कारणीभूत जें लिंगशरीर त्याच्या नाशाचा उपाय न जाणतां बंधनाला मात्र कारण, अशीं कर्में करून काय उपयोग होणार ? ॥ ११ ॥ तसाच षड्‌गुणैश्वर्यसंपन्न, स्वत:च्याच आधारानें असलेला आणि सर्वसाक्षी असा मायातीत ईश्वर एकच आहे. त्या नित्यमुक्त परमात्म्याला अवलोकन न करितां बंधनाला मात्र कारण, अशा कर्मांनीं पुरुषाचें काय होणार आहे ? ॥ १२ ॥ तशीच ज्याची प्राप्ति झाली असतां पाताळांत गेल्याप्रमाणें पुरुष जेथून कधींहि कोणी परत येत नाहीं, तें ज्योतिरूप ब्रह्म न जाणणाऱ्या पुरुषाला नश्वर अशा स्वर्गादिप्रापक कर्मांनीं या जगतामध्यें काय उपयोग होणार आहे ? ॥ १३ ॥ जारिणी

स्त्रीप्रमाणें मोहक अशा गुणांनीं युक्त होऊन अनेक रूपें धारण करणारी अशी आपली बुद्धि आहे. तिचा नाश ज्याला करतां आला नाहीं त्या पुरुषाला इतर कर्मांनीं इहलोकीं काय उपयोग होणार आहे ? ॥ १४ ॥ त्या बुद्धीच्या संगानें स्वातंत्र्य नष्ट होऊन दुष्ट स्त्रीच्या पतीप्रमाणें तिच्या सुखदु:खरूप गतीचा अनुभव घेणारा जो जीव, त्याला न जाणणाऱ्या पुरुषाला इहलोकीं विवेकशून्य अशा कर्मांचा काय उपयोग होणार आहे ? ॥ १५ ॥ उत्पत्ति व लय करणारी आणि संसाररूप प्रवाहामध्यें पडलेल्या लोकांना बाहेर पडण्यास प्रतिबंध करण्याकरितां क्रोध, अहंकार इत्यादि वेगांनीं युक्त झालेली अशी जी माया, त्या मायेच्या वेगानें हत झालेला व त्यामुळें स्वरूपाचा विचार न करणारा जो पुरुष, त्याला मायिक कर्मांनीं काय उपयोग होणार आहे ? ॥ १६ ॥ पंचवीस तत्त्वांचा जो अंतर्यामी आश्चर्यकारक आश्रय आहे त्या अध्यात्मरूप ईश्वराला न जाणणाऱ्या पुरुषाला मिथ्या स्वातंत्र्याभिमानानें इहलोकीं केलेल्या कर्मांनीं काय उपयोग होणार आहे ? ॥ १७ ॥ चिज्जडात्मक वस्तूचें ज्यांत विवेचन केलें आहे व जें बंध आणि मोक्ष ह्यांना दर्शविणारें आहे, त्या ईश्वरप्रतिपादक शास्त्राचा अभ्यास न केल्यामुळें त्याविषयीं अज्ञानी असलेल्या पुरुषाला, बहिर्मुख कर्मांनीं काय उपयोग होणार आहे ? ॥ १८ ॥ तीक्ष्ण व सर्व जगताचें आकर्षण करणारें असें जें भ्रमण करणारें कालचक्र, तें न जाणणाऱ्या पुरुषाला मिथ्या कर्मांनीं इहलोकीं काय उपयोग होणार आहे ? ॥ १९ ॥ आणि शास्त्ररूप पित्याची निवृत्तिमार्गाच्या उपयोगार्थ असलेली निवृत्तिकारक आज्ञा, जो पुरुष जाणत नाहीं तो गुणमय प्रवृत्तिमार्गावर विश्वास ठेवून सृष्ट्यादि कर्माला कसा प्रवृत्त होईल ? ॥ २० ॥ असो. हे राजा, एकविचारानें युक्त असलेल्या त्या हर्यश्वांनीं, नारदाच्या गूढ वाक्यांचा निश्चय करून त्याला प्रदक्षिणा केली आणि ते मोक्षमार्गाकडे निघून गेले ॥ २१ ॥ इकडे तो नारदहि नादब्रह्माच्या द्वारा साक्षात्कार झालेल्या हृषीकेशाच्या चरणकमळावर आपलें चित्त एकाग्र करून लोकांमध्यें संचार करूं लागला ॥ २२ ॥ नंतर आपले सुस्वभावी पुत्र नारदाच्या उपदेशामुळें धर्मापासून भ्रष्ट झाले, असें ऐकून दक्षप्रजापतीला फार दु:ख झालें व अत्यंत रागहि आला. कारण, सत्पुत्र असणें हें एक शोकाचें कारण आहे ॥ २३ ॥ पुढें ब्रह्मदेवानें त्याचें सांत्वन केलें असतां त्या दक्षप्रजापतीनें आपल्या असिक्नीनामक भार्येच्या ठिकाणीं पुनरपि हजारों शबलाश्व नांवाचे पुत्र उत्पन्न केले ॥२४॥ नंतर त्याहि पुत्रांना प्रजोत्पादनाविषयीं आज्ञा दिली; परंतु तेहि आपले भाऊ ज्या ठिकाणीं सिद्धकोटीला गेले त्या नारायणनामक सरोवराच्या कांठीं ब्रह्मचर्यादि व्रत घेऊन तपश्चर्या करण्याकरितां निघून गेले ॥२५॥ सरोवरांत स्नान केल्यानें त्यांच्या अंत:करणांतील विकाररूपी मळ अगदीं नाहींसा झाला व तेथें त्यांनीं परब्रह्मरूप प्रणवमंत्राचा जप करीत मोठी तपश्चर्या आरंभिली ॥ २६ ॥ प्रथमत: त्यांनीं कांहीं महिने जलपान करून व पुढें कांहीं महिने केवळ वायु भक्षण करून, पुढें सांगितलेल्या अर्थाच्या मंत्राचा जप करीत मंत्राधिपति भगवंताचें आराधन केलें ॥ २७ ॥ " अत्यंत शुद्ध चित्ताचा आश्रय करून सर्वांतर्यामी व सर्वव्यापी परमहंस नारायणाचें आम्हीं ॐकारपूर्वक नमस्कार करून ध्यान करितों ॥ २८ ॥ हे राजेंद्रा, ह्याप्रमाणें सृष्टीची

वृद्धि करण्याची इच्छा करणाऱ्या त्या शबलाश्वांनाहि नारदमुनीनें येऊन पूर्वीप्रमाणें गूढ शब्दांनीं उपदेश केला ॥ २९ ॥ तो म्हणाला,–हे दक्षपुत्र हो, तुम्ही उपदेशपर असें माझें भाषण एकाग्रचित्तानें ऐका आणि हे भ्रातृवत्सल हो, आपल्या ज्येष्ठ बंधूंचा मार्ग अवलोकन करा ॥ ३० ॥ कारण, जो धर्मवेत्ता भाऊ आपल्या भ्रात्यांच्या श्रेष्ठ मार्गाला अनुसरतो, त्या पुण्यवान् पुरुषालाच भ्रातृवत्सल अशा मरुद्गणनामक देवांसह स्वर्गामध्यें आनंद प्राप्त होतो ॥ ३१ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें यथार्थज्ञानी असा तो नारदमुनि त्यांना उपदेश करून तेथून निघून गेला व ते शबलाश्वहि आपल्या ज्येष्ठ बंधूंच्याच मार्गाला अनुसरले ॥ ३२ ॥ एकदां येऊन गेलेल्या रात्री जशा परत येत नाहींत त्याप्रमाणें अंतर्मुख वृत्तीनेंच होणाऱ्या अशा त्या परमेश्वराच्या योग्य मार्गाला एकदां गेलेले केव्हांहि माघारे आले नाहींत ॥ ३३ ॥

इकडे ह्या वेळीं पुष्कळ उत्पात झालेले दक्षप्रजापतीच्या दृष्टीस पडले आणि आपले पुत्र नारदानें पूर्वीप्रमाणें धर्मापासून भ्रष्ट केले, असेंहि वर्तमान त्यानें ऐकिलें ॥ ३४ ॥ तेव्हां तो पुत्रशोकानें अगदीं मोहित होऊन नारदावर क्रुद्ध झाला. इतक्यांत देवर्षि नारदहि तेथें आला. त्याला पाहून दक्षाचे ओंठ थरथरूं लागले आणि तो नारदाला म्हणाला ॥ ३५ ॥

दक्ष म्हणाला,–हे दुष्ट नारदा, साधुवेष धारण करणाऱ्या तूं आमच्या पुत्रांचें खचित अकल्याण केलें आहेस. कारण, ते स्वधर्मामध्यें प्रवृत्त झाले असतां तूं त्यांना संन्याशाचा मार्ग दाखविलास ॥ ३६ ॥ तीन ऋणें फेडल्यावांचून संन्यासाचा आश्रय केला, तर मोठा अनर्थच होतो. यास्तव, हे पापी नारदा, ब्रह्मचर्यव्रत व यज्ञानुष्ठान यांच्या योगेंकरून ऋषि, पितर व देव यांच्या ऋणांपासून माझे पुत्र मुक्त झाले नसल्यामुळें व त्यांनीं कर्मांचाहि विचार केला नसल्यामुळें त्यांचा या लोकसंबंधीं व परलोकसंबंधीं कल्याणाचा तूं विघात केला आहेस ॥ ३७ ॥ याप्रमाणें बालकांचा बुद्धिभेद करणारा असा निर्दय तूं श्रीहरीच्या यशाचाहि नाश करणारा असून त्याच्या पार्षदगणांमध्यें निर्लज्जपणें कसा संचार करितोस ? ॥ ३८ ॥ अरे, खरोखर वैरभावरहित प्राण्यांशीं वैर करून त्यांच्या मित्रत्वाचा नाश करणाऱ्या अशा तुझ्यांवाचून इतर सर्व भगवद्भक्त, भूतांवर अनुग्रह करण्याविषयीं अगदीं तत्पर असतात ॥ ३९ ॥ हे नारदा, पण याप्रमाणें ज्ञानावांचून केवळ अवधूतवेष धारण करणाऱ्या तूं, किती जरी बुद्धिभेद केलास तरी, पुरुषांस खरें वैराग्य कधींहि उत्पन्न होणार नाहीं, आणि वैराग्यावांचून ज्ञान नाहीं व ज्ञानावांचून स्नेहपाश तुटून जाणार नाहीं ॥ ४० ॥ कारण विषयांचा तीक्ष्णपणा पुरुषाला अनुभव घेतल्यावांचून समजणार नाहीं. अनुभवानें ती गोष्ट जाणविल्यावर पुरुषाला स्वतःच जसें वैराग्य उत्पन्न होईल, तसें इतरांनीं बुद्धिभेद केल्यानें होणार नाहीं ॥ ४१ ॥ असो. ह्याप्रमाणें कर्ममर्यादेनें वागणाऱ्या आम्हां सदाचारसंपन्न गृहस्थाचें तूं असह्य अप्रिय केलें असूनहि, आम्ही तें सहन केलें आहे ॥ ४२ ॥ तथापि, हे संतानच्छेदका, ज्या अर्थीं तूं आमचें अकल्याण केलें आहेस, त्या अर्थीं, हे मूढा, लोकांमध्यें भ्रमण करीत असतां तुला कोठेंहि निश्चल स्थान प्राप्त होणार नाहीं ॥ ४३ ॥

शुकाचार्य म्हणतात,——हे परीक्षित्राजा, लोकांमध्यें साधु म्हणून संमत अशा नारदमुनीनें त्या दक्षाच्या शापाचा ' तथास्तु ' म्हणून स्वीकार केला. कारण, स्वतः उलट शाप देण्यास समर्थ असतांहि सहन करणें हाच साधु शब्दाचा अर्थ आहे ॥ ४४ ॥

**पांचवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, नंतर ब्रह्मदेवानें त्या दक्षनामक प्रचेत्याच्या पुत्राचें सांत्वन केलें असतां त्याने आपल्या असिक्नीनामक भार्येच्या ठिकाणीं साठ कन्या उत्पन्न केल्या. त्या कन्या मात्र आपल्या पित्याचा प्रजावृद्धिरूप संकल्प पूर्ण करणाऱ्या झाल्या ॥१॥ त्यांपैकीं, धर्माला दहा, कश्यपाला तेरा, चंद्राला सत्तावीस, भूत, अंगिरा आणि कृशाश्व, ह्या प्रत्येकाला दोन दोन आणि अवशिष्ट राहिलेल्या चार कन्या तार्क्ष्य नांवाच्या कश्यपाला दक्षानें अर्पण केल्या ॥ २ ॥ हे राजा, त्यांच्या मुलां-नातवांनीं सारें त्रैलोक्य भरून गेलें. आतां ह्या मुलांसह दक्षकन्यांचीं नांवें तूं मजपासून श्रवण कर ॥ ३ ॥ हे राजा, भानु, लंबा, ककुब्, जामि, विश्वा, साध्या, मरुत्वती, वसु, मुहूर्ता आणि संकल्पा, ह्या दहा धर्माच्या स्त्रिया होत. आतां त्यांचे पुत्र श्रवण कर ॥ ४ ॥ हे राजा, भानूपासून देवऋषभ झाला व त्या देवऋषभापासून इंद्रसेन झाला. लंबेपासून विद्योतनामक पुत्र झाला व त्याला स्तनयित्नुनामक पुत्र झाले ॥ ५ ॥ककुबपासून संकट, त्याच्यापासून कीकटनामक पुत्र व त्या कीकटापासून भूमीवरील दुर्गाभिमानी देव उत्पन्न झाले.जामीपासून स्वर्ग व स्वर्गापासून नंदिनामक पुत्र उत्पन्न झाला. ॥ ६ ॥ विश्वेपासून विश्वदेवनामक पुत्र झाले. त्यांना पुढें संतति झाली नाहीं असें म्हणतात. तसेच साध्येपासून साध्यनामक गण व त्यांच्यापासून अर्थसिद्धिनामक पुत्र उत्पन्न झाला. ॥ ७ ॥ मरुत्वतीचे ठिकाणीं मरुत्वान आणि जयंत असे दोन पुत्र उत्पन्न झाले. त्यांपैकीं जो जयंत नांवाचा पुत्र होता तो वासुदेवाचा अंश असून त्याला उपेंद्र असें म्हणतात ॥ ८ ॥ तसेंच मुहूर्ताभिमानी देवगण मुहूर्तेपासून उत्पन्न झाले व तेच प्राण्यांना आपआपल्या मुहूर्तरूपी काळापासून उत्पन्न झालेलें फळ देतात ॥ ९ ॥ संकल्पेपासून संकल्पनावक पुत्र झाला व त्यापासून कामनामक पुत्र उत्पन्न झाला असें म्हटलें आहे. आतां वसूपासून जे अष्टवसुनामक आठ पुत्र झाले, त्यांचीं नांवें तूं मजपासून श्रवण कर ॥ १० ॥ हे राजा, द्रोण, प्राण, ध्रुव, अर्क, अग्नि, दोष, वसु आणि विभावसु हीं त्यांचीं नांवें असून त्यांपैकीं द्रोणाच्या अभिमतिनामक पत्नीपासून हर्ष, शोक व भय इत्यादिक पुत्र उत्पन्न झाले ॥ १२ ॥ प्राणाची ऊर्जस्वतीनामक भार्या असून तिच्यापासून सह, आयु व पुरोजव, असे तीन पुत्र झाले. ध्रुवाच्या धरणीनामक भार्येला नाना प्रकारचे नगराभिमानी देवे झाले ॥१२॥ तशीच अर्काची वासनानामक भार्या असून तिला तर्षादिक पुत्र झाले. अग्नीची भार्या वसोर्धारा असून तिच्या ठिकाणीं द्रविणक इत्यादि पुत्र जन्मास आले ॥१३॥ त्याप्रमाणें स्कंद हा कृत्तिकांचा पुत्र असून तो अग्नीचा पुत्र आहे. त्या स्कंदापासून विशाखादिक पुत्र उत्पन्न झाले. दोषाची भार्या शर्वरी असून तिचे ठिकाणीं श्रीहरीचा अंश असा शिशुमारनामक पुत्र उत्पन्न झाला ॥ १४ ॥ तशीच आंगिरसी ही वसूची भार्या असून तिचे ठिकाणीं विश्वकर्मा हा शिल्पाचार्य पुत्र उत्पन्न झाला. त्या विश्व-

कर्म्यापासून चाक्षुषनामक मनु पुत्र उत्पन्न झाला. चाक्षुष मनूपासून विश्वेदेव व साध्यगण हे पुत्र उत्पन्न झाले ॥ १५ ॥ विभावसूची उषानामक भार्या असून तिच्या ठिकाणीं व्युष्ट, रोचिष आणि आतप असे तीन पुत्र उत्पन्न झाले. त्यांतील आतपापासून ज्याच्या योगानें सर्व प्राणी कर्मांच्या ठिकाणीं प्रवृत्त होतात, असा पंचायामनामक पुत्र झाला ॥ १६ ॥ त्याचप्रमाणें भूतनामक ऋषीची जी सरूपानामक भार्या, तिचे ठिकाणीं कोट्यवधि रुद्र उत्पन्न झाले व रैवत, अज, भव, भीम, वाम, उग्र, वृषाकपि, अजैकपाद्, अहिर्बुध्न्य, बहुरूप आणि महान् अशा अकरा रूपांनीं युक्त असलेल्या रुद्राचे जे भूत, प्रेत, विनायक इत्यादिक भयंकर पार्षदगण, ते त्या भूतऋषीच्या दुसऱ्या घोरानामक भार्येपासून उत्पन्न झाले ॥ १७ ॥ १८ ॥ तशाच अंगिरानामक प्रजापतीच्या एका स्वधानामक पत्नीनें पितरांचा व दुसऱ्या सतीनामक पत्नीनें अथर्वांगिरसनामक वेदाचा पुत्र या नात्यानें स्वीकार केला ॥ १९ ॥ कृशाश्व ऋषीनें आपल्या अर्चिर्नामक भार्येच्या ठिकाणीं धूम्रकेशनामक पुत्रास व धिषणानामक भार्येच्या ठिकाणीं, वेदशिरस, देवल, वयुन आणि मनु ह्या चार पुत्रांस उत्पन्न केलें ॥ २० ॥ तशाच तार्क्ष्य हें नांव धारण करणाऱ्या कश्यपाच्या विनता, कद्रू, पतंगी आणि यामिनी ह्या चार भार्या असून त्यांपैकीं पतंगीच्या ठिकाणीं पक्षी, यामिनीच्या ठिकाणीं टोळ, सुपर्णेच्या ठिकाणीं साक्षात् यज्ञाधिपति विष्णूचें वाहन गरुड व सूर्याचा सारथि अरुण आणि कद्रूच्या ठिकाणीं अनेक नाग उत्पन्न झाले ॥ २१ ॥ २२ ॥ हे भरतकुलोत्पन्ना परीक्षित्राजा, कृत्तिकादिक सत्तावीस जीं नक्षत्रें त्या चंद्राच्या भार्या होत; परंतु त्यांपैकीं रोहिणीच्या ठिकाणीं चंद्राचें अतिशय प्रेम असल्यामुळें तो इतरांची उपेक्षा करीत असे; म्हणून दक्षानें क्रुद्ध होऊन त्याला शाप दिल्यामुळें तो क्षयरोगानें ग्रस्त झाला आणि त्याला त्यांच्या ठिकाणीं अपत्यें प्राप्त झालीं नाहींत ॥ २३ ॥ पुढें चंद्रानें दक्षाला पुनः प्रसन्न करून कृष्णपक्षामध्यें क्षय पावणाऱ्या आणि शुक्लपक्षामध्यें वृद्धिंगत होणाऱ्या अशा सोळा कला मात्र प्राप्त करून घेतल्या. आतां हे राजा, ज्यांच्या संततीपासून हें सर्व जग भरून गेलें आहे, त्या लोकमाता अशा कश्यपपत्नींचीं कल्याणकारक नांवें श्रवण कर. हे राजा, अदिति, दिति, दनु, काष्ठा, अरिष्टा, सुरसा, इला ॥ २४ ॥ २५ ॥ मुनि, क्रोधवशा, ताम्रा, सुरभि, सरमा व तिमि अशीं त्यांचीं तेरा नांवें असून त्यांपैकीं तिमीपासून जलचरगण आणि सरमेपासून व्याघ्रादि वनचर प्राणी उत्पन्न झाले ॥ २६ ॥ हे राजा, सुरभीपासून म्हशी, गाई व इतर दोन खुरी मेंढे, बकरे आदिकरून उत्पन्न झाले. तसेंच ताम्रेपासून श्येन व गृध्र इत्यादि क्रूर पक्षी आणि मुनीपासून अप्सरांचे समुदाय उत्पन्न झाले ॥ २७ ॥ हे राजा, दंदशूकादि सर्प हे क्रोधवशेचे पुत्र होत. सर्व वृक्ष इलेचे पुत्र होत आणि यातुधाननामक राक्षसगण हे सुरसेचे पुत्र होत ॥ २८ ॥ तसेंच अरिष्टेचे गंधर्व व एक खुरांचे अश्वादिक पशु हे काष्ठेचे पुत्र होत. दनूचे एकसष्ट पुत्र होते. त्यांपैकीं मुख्य तूं श्रवण कर ॥ २९ ॥ हे राजा, द्विमूर्धा, शंबर, अरिष्ट, हयग्रीव, विभावसु, अयोमुख, शंकुशिरा, स्वर्भानु, कपिल, अरुण, पुलोमा, वृषपर्वा, एकचक्र, अनुतापन, धूमकेश, विरूपाक्ष, विप्रचित्ति आणि दुर्जय हे अठरा पुत्र मुख्य होत ॥ ३० ॥ ३१ ॥

त्यांपैकीं स्वर्भानूच्या स्वप्रभानामक कन्येशीं नमुचीनें व वृषपर्व्याच्या शर्मिष्ठानामक कन्येशीं महाबलाढ्य नहुषपुत्र ययाति राजानें विवाह केला ॥ ३२ ॥ तसाच दनूचा वैश्वानरनामक एक पुत्र होता. त्यास उपदानवी, हयशीरा, पुलोमा व कालका या नांवांच्या सुंदर रूपसंपन्न अशा चार कन्या होत्या. त्यांपैकीं, हिरण्याक्षानें उपदानवीशीं, क्रतूनें हयशिरेशीं व भगवान् कश्यपनामक प्रजापतीनें ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून पुलोमा आणि कालका ह्या दोन्ही वैश्वानरकन्यांशीं विवाह करून घेतला. कश्यपानें वरिलेल्या त्या कन्यांपासून पौलोम व कालकेय असे निवातकवचनामक साठ हजार युद्धशाली दानव उत्पन्न झाले. हे राजा, तुझा पितामह अर्जुन स्वर्गाला गेला होता, तेव्हां इंद्राचें प्रिय करण्याकरितां त्यानें एकट्यानेंच त्या यज्ञविघातक साठ हजार निवातकवचांचा वध केला ॥ ३३ ॥ ॥ ३४ ॥ ३५ ॥ ३६ ॥ त्याचप्रमाणें विप्रचित्तिनामक दानवाला सिंहिकेपासून एक एक पुत्र झाले. पुढें जो नवग्रहांपैकीं एक ग्रह झाला तो राहु, त्यांतील ज्येष्ठ पुत्र असूनें बाकीचे केतुनामक शंभर पुत्र त्यापेक्षां कनिष्ठ होते ॥ ३७ ॥ हे राजा, आतां अदितीच्या वंश तूं मजपासून श्रवण कर. या वंशामध्यें साक्षात् सर्वव्यापी जलशायी परमेश्वर अवतीर्ण झाला ॥ ३८ ॥ विवस्वान्, अर्यमा, पूषा, त्वष्टा, सविता, भग, धाता, विधाता, वरुण, मित्र, शक्र आणि उरुक्रम हे बारा आदित्य होत ॥ ३९ ॥ त्यांपैकीं विवस्वानाच्या महाभाग्यवती संज्ञानामक भार्येला श्राद्धदेवनामक मनु व यमदेव आणि यमुना याप्रमाणें जुळीं अशीं अपत्यें झालीं व तीच संज्ञा स्त्री घोडीचें रूप धारण करून पृथ्वीवर गेली असतां तिला अश्विनीकुमारनामक दोन पुत्र झाले ॥ ४० ॥ तशीच विवस्वानाची छाया-नामक जी दुसरी पत्नी तिला शनैश्चर व सावर्णिनामक मनु हे दोन पुत्र आणि तपतीनामक कन्या अशीं तीन अपत्यें झालीं. त्या तपतीनें पुढें संवरणनामक ऋषीला वरिलें ॥ ४१ ॥ त्याचप्रमाणें अर्यमानामक आदित्याची मातृका ही पत्नी होय. त्या उभयतांना कृताकृतज्ञान-संपन्न असे पुष्कळ पुत्र झाले. त्या पुत्रांच्या संततीमध्यें आपलें पूर्वापर अनुसंधान राखण्याचें ज्ञान असल्यामुळें तिला ब्रह्मदेवानें मनुष्यजाती म्हणून कल्पिलें आहे ॥ ४२ ॥ पूषानामक आदित्य, दक्षप्रजापतीवर क्रुद्ध झालेल्या परमेश्वरास, दांत बाहेर काढून हंसल्या-मुळें भग्नदंत होऊन पिष्ट भक्षण करणारा झाला, हें पूर्वी मीं तुला सांगितलेंच आहे. या पूषाला कांहींच संतती झाली नाहीं ॥४३॥ रचनानामक दैत्याची कनिष्ठ भगिनी त्वष्ट्याची भार्या असून त्या उभयतांना संनिवेश आणि महापराक्रमी विश्वरूप असे दोन पुत्र झाले ॥ ४४ ॥ जेव्हां देवांनीं अवज्ञा केल्यामुळें बृहस्पति गुरूनें त्यांचा त्याग केला, तेव्हां शत्रूंच्या कन्येचा पुत्र असतांहि त्या विश्वरूपालाच देवांनीं आपला गुरु केलें ॥ ४५ ॥

## सहावा अध्याय समाप्त

कश्यप पत्नी अदितीचा पुत्र जो त्वष्टा, त्याची स्त्री = दैत्यभगिनी रचना त्वष्ट्यापासून रचनेला विश्वरूप झाला व देवांनी अवज्ञा केल्याने देवगुरु बृहस्पतीने देवांचा त्याग केल्यावर देवांनी या विश्वरूपाला गुरु केले

# अध्याय ७ वा

परीक्षितराजा म्हणाला,—हे भगवन्, आचार्य बृहस्पतीनें आपल्या देवशिष्यांचा त्याग कशाकरितां केला ? कारण अपराधावांचून असें होण्याचा संभव नाहीं. यास्तव शिष्यांनीं गुरूचा काय अपराध केला, हें तूं मला कथन कर ॥ १ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे भरतकुलोत्पन्ना राजा, त्रिभुवनाच्या ऐश्वर्यानें मत्त होऊन इंद्रानें एकदां सन्मार्गाचें उल्लंघन केलें, ( त्यामुळें देवगुरूनें त्याचा त्याग केला होता. ती कथा तुला सांगतो. ऐक. ) एकदां मरुद्गण, अष्टवसु, एकादशरुद्र, द्वादशादित्य, ऋभुगण, विश्वेदेव, साध्य आणि अश्विनीकुमार हे त्याच्या सभोंवतीं बसले होते. सिद्ध, चारण, गंधर्व, ब्रह्मवेत्ते मुनि, विद्याधर, अप्सरागण, किन्नर, पक्षी आणि नाग हे त्याची उत्तम रीतीनें सेवा करून त्याचे गुण गात त्याची स्तुति करीत होते; सभेमध्यें तो सिंहासनावर बसला होता, व चंद्रमंडलासारखें मनोहर असें श्वेतच्छत्र व इतरहि चवऱ्या व पंखे वगैरे सार्वभौम चिन्हें जवळ झळकत होतीं. त्याच्या आसनाच्या अर्धभागावर बसलेल्या इंद्राणीसह तो इंद्र अतिशय शोभत होता ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥ असा तो बसला असतां देव व दैत्य यांनीं पूजित, मुनींमध्यें श्रेष्ठ, स्वतःचा व देवांचा परम गुरु असा बृहस्पति सभेमध्यें प्राप्त झाला असतां, त्याला अवलोकन करूनहि इन्द्रानें त्याला सामोरें जाऊन आसन इत्यादिकांच्या योगानें त्याचा आदर केला नाहीं. आपल्या आसनावरून तो किंचित्हि हललासुद्धां नाहीं. तेव्हां ऐश्वर्यमदापासून हा विकार इंद्राला उत्पन्न झाला आहे असें जाणून, तो अंगिराऋषीचा पुत्र ज्ञानसंपन्न प्रभु बृहस्पति तत्काळ तेथून मुकाट्यानें घरीं परत आला ॥ ७ ॥ ८ ॥ ९ ॥ तेव्हां इंद्राला आपल्या हातून गुरूची हेळणा झाली हें जाणवलें आणि सभेमध्यें तो स्वतः आपणच आपली निंदा करून घेऊं लागला ॥ १० ॥ इंद्र म्हणाला, अरेरे ! मी केलेलें कर्म अगदीं अयोग्य आहे. कारण, मीं मंदमतीनें ऐश्वर्याच्या योगानें मत्त होऊन सभेमध्यें गुरूचा तिरस्कार केला आहे ॥ ११ ॥ अहो, जिच्या योगानें सत्त्वगुणप्रधान अशा देवांचाहि मी राजा असतां मला आज अहंकार प्राप्त झाला, त्या स्वर्गाधिपतीच्या लक्ष्मीचाहि कोणता ज्ञानी पुरुष इच्छा करील ? ॥ १२ ॥ हे देव हो, सार्वभौम राजाच्या सिंहासनावर आरूढ झालेल्यानें कोणालाहि प्रत्युत्थान देऊं नये, असें जे कोणी म्हणत असतील, ते खरा धर्म जाणत नाहींत. कारण, कुलसंपन्न ब्राह्मण अथवा सर्वव्यापी विष्णूचा भक्त येत असतां त्याला पाहून जो आसनावरून उठत नाहीं, तो दुःखांनीं पीडित होतो असें शास्त्र आहे ॥ १३ ॥ ह्याकरितां कुमार्गाचा उपदेश करून नरकामध्यें पडणाऱ्या त्या लोकांच्या वचनावर जे विश्वास ठेवतात तें सुद्धां पाषाणाच्या होडीमध्यें बसलेल्या लोकांप्रमाणें बुडून जातात ॥ १४ ॥ तस्मात्, गंभीरबुद्धीनें युक्त असलेल्या त्या देवगुरु ब्राह्मणाच्या चरणीं मस्तक ठेवून मी त्याला निष्कपट-

पणानें प्रसन्न करून घेईन!' ॥ १५ ॥ ह्याप्रमाणें तो इंद्र विचार करीत असतां, भगवान् बृहस्पति आपल्या सर्वोत्कृष्ट मायेच्या योगानें स्वगृहांतून अंतर्धान पावला ॥ १६ ॥ नंतर आपला गुरु कोठें आहे याचा शोध करून पाहत असतांहि जेव्हां त्या भगवान् देवाधिपति इंद्राला त्याचा पत्ता लागेना, तेव्हां तो इंद्र असुरांपासून आमचें रक्षण कसें होईल, ह्याविषयीं देवांसह बुद्धिपूर्वक विचार करूं लागला; पण त्याच्या मनाला स्वस्थता वाटेना ॥ १७ ॥ इतक्यामध्यें तो वृत्तांत श्रवण करितांच दुर्मद असे सर्व असुर शुक्राचार्यांची संमति घेऊन व शस्त्रास्त्रें धारण करून देवांबरोबर युद्ध करण्यास उद्युक्त झाले ॥ १८ ॥ तेव्हां त्यांनीं टाकिलेल्या तीक्ष्ण बाणांच्या योगानें देवांचीं मस्तकें, मांड्या व बाहू हीं तुटून जाऊं लागलीं आणि मग इंद्रासह ते सर्वजण माना खालीं घालून ब्रह्मदेवाला शरण गेले ॥ १९ ॥ त्या वेळीं अयोनिसंभव भगवान् ब्रह्मदेव, पीडित झालेल्या त्या देवांना पाहून, मोठ्या कृपेनें त्यांचें सांत्वन करीत त्यांच्याशीं बोलूं लागला ॥ २० ॥

ब्रह्मदेव म्हणाला,—हे देव हो, खरोखर तुम्ही ऐश्वर्याच्या मदानें, इंद्रियदमन केलेल्या ब्रह्मज्ञानी ब्राह्मणाचा अनादर केलात, ही गोष्ट फारच वाईट झाली ॥ २१ ॥ देव हो, तुम्हीं समृद्ध असूनहि स्वतः ज्यांना मारणारे आहांत त्या तुमच्या क्षीण झालेल्या शत्रूंपासून जो तुमचा पराभव झाला, हें त्या अपराधाचेंच फळ होय ॥ २२ ॥ हे इंद्रा, गुरूचा तिरस्कार केल्यामुळें प्रथम अगदीं क्षीण झालेल्या व आतां त्या शुक्राचार्यांची भक्ति करून समृद्ध झालेल्या आपल्या ह्या शत्रूंकडे पहा! अरे, फार काय सांगावें? आपल्या शुक्रगुरूला देवतेसमान मानणारे हे असुर आज माझेंहि स्थान हिरावून घेतील ॥ २३ ॥ अभेद्य मंत्रानें युक्त असलेले हे शुक्राचार्यांचे शिष्य असुर या वेळीं स्वर्गाची तरी क्षिति बाळगितात काय? कारण ब्राह्मण, गोविंद व गाई हीं ज्यांच्यावर अनुग्रह करतात त्यांचें अकल्याण केव्हांहि होत नाहीं. इतरांचें मात्र होतें ॥ २४ ॥ यास्तव, हे देव हो, जितेंद्रिय, तपस्वी आणि आत्मज्ञानसंपन्न असो जो त्वष्ट्याचा पुत्र विश्वरूप नांवाचा ब्राह्मण आहे, त्याच्यकडे तुम्ही आतांच जा आणि त्याचा सत्कार करून त्याला गुरु करून घ्या, म्हणजे तो तुमचे मनोरथ पूर्ण करील; परंतु तो असुरांचा पक्षपाती असल्यामुळें, त्याचें असुरपक्षपातित्व तुम्ही सहन कराल तरच हें घडेल ॥ २५ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, याप्रमाणें ब्रह्मदेवानें आज्ञा केली असतां, ते देव चिंतारहित होऊन त्या विश्वरूप ऋषीजवळ गेले व त्यास आलिंगन देऊन विनंती करूं लागले ॥ २६ ॥

देव म्हणाले,—बा विश्वरूपा, तुझें कल्याण असो. आम्ही तुझ्या आश्रमांत अतिथि म्हणून आलों आहों. याकरितां आम्हां पितरांचा यासमयीं योग्य असलेला मनोरथ तूं पूर्ण कर ॥ २७ ॥ हे ब्रह्मनिष्ठा, जे सत्पुत्र आहेत ते जरी पुत्रवंत असले, तथापि पितरांची शुश्रूषा करणें हाच त्यांचा उत्कृष्ट धर्म होय. तेव्हां, तुम्हांसारख्या ब्रह्मचारी पुत्रांचा हाच धर्म आहे, हें सांगावयास नकोच ॥ २८ ॥ याप्रमाणें आचार्य ही वेदांची मूर्ति आहे, पिता ब्रह्मदेवाची मूर्ति आहे आणि भ्राता इंद्राची मूर्ति आहे. तशीच माता

साक्षात् पृथ्वीची मूर्ति असून भगिनी दयेची मूर्ति, अतिथि धर्माची मूर्ति, अभ्यागत ही अग्नीची मूर्ति व सर्व भूतें ईश्वराची मूर्ति होत ॥ २९ ॥ ३० ॥ म्हणून, बा हे विश्वरूपा, पीडित झालेल्या आम्हां पितरांचा शत्रूंनीं पराभव केल्यामुळें आम्हांला झालेली पीडा तूं आपल्या तपानें दूर करण्याकरितां आमच्या विनंतीचा अंगीकार कर ॥ ३१ ॥ हे विश्वरूपा, तूं ब्रह्मज्ञानी व ब्राह्मण असल्यामुळें आम्ही तुला गुरुस्थान देऊन उपाध्याय करितों; म्हणजे तुझ्या तेजाच्या योगानें आम्हीं अनायासें शत्रूंना जिंकून टाकूं ॥ ३२ ॥ हे ब्रह्मनिष्ठा, योग्य कारणासाठीं ज्येष्ठांनीं कनिष्ठांचें अभिनंदन केलें तर तें निंद्य आहे असें वृद्धजन मानीत नाहींत, आणि त्यांतूनहि वेदांहून इतर विषयांतच वय हे वडीलपणाला कारण आहे. मंत्राविषयीं तसें नाहीं. याकरितां आम्हांला मंत्र सांगणारा या नात्यानें तूंच आमचा वडील आहेस ॥ ३३ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले,--याप्रमाणें देवगणांनीं उपाध्याय होण्यासाठीं त्या महातपस्वी विश्वरूपाची प्रार्थना केली असतां, तो प्रसन्न झाला आणि मधुरवाणीनें त्यानें त्यांना उत्तर दिलें. ॥ ३४ ॥

विश्वरूप म्हणाला,—हे नाथ हो, उपाध्यायपण हें वृद्धिंगत झालेल्या ब्रह्मतेजाचा व्यय करणारें असल्यामुळें धर्मशील लोकांनीं निंद्य मानिलें आहे. परंतु आपल्यासारख्या लोकपालांनीं त्याची मागणी केली असतां मजसारखा आपला शिष्य तें कसें नाकारील? कारण, ‘तुमच्यासारख्यांचें वचन अमान्य न करणें हाच शिष्याचा पुरुषार्थ आहे’ असें शास्त्रवेत्ते म्हणतात ॥ ३५ ॥ हे देव हो, द्रव्यहीन तपस्वी लोकांचें धन म्हटलें म्हणजे ‘शिलोञ्छन’ हें होय. त्या द्रव्यानेंच ह्या गृहस्थाश्रमामध्यें साधूंचीं सत्कर्मे आचरण करणारा मी आहें. तेव्हां ज्यांच्या योगानें दुष्टबुद्धि लोकांनाच हर्ष होतो, तें निंद्य उपाध्यायपण मी मनापासून कसें बरें स्वीकारीन ! ॥ ३६ ॥ असें जरी असलें, तरी तुमचें म्हणणें मी अमान्य करीत नाहीं. कारण तुम्ही माझे गुरु असून तुमचें मागणें अगदीं अल्प आहे. याकरितां मी माझें सारें द्रव्य व प्राणहि वेंचून तुमचें सर्व मागणें पूर्ण करीन ॥३७॥

शुकाचार्य म्हणाले,–हे परीक्षित्राजा, त्या महातपस्वी विश्वरूपानें ह्याप्रमाणें देवांना वचन दिलें असतां त्यांनीं त्याला आचार्यत्व दिलें व त्यानें दीर्घ प्रयत्नानें त्यांचें तें उपाध्यायपण स्वीकारिलें ॥ ३८ ॥ समर्थ विश्वरूपानें शुकाचार्यांच्या विद्येनें संरक्षित अशी देवद्वेषी असुरांची संपत्ति, नारायणकवचात्मक वैष्णवविद्येच्या योगानें असुरापासून बलात्कारानें हिरावून घेऊन इंद्राला अर्पण केली ॥ ३९ ॥ जिच्या योगानें सुरक्षित झालेल्या प्रभु इंद्रानें दैत्यांच्या सैन्याचा पराभव केला ती नारायणकवचरूप वैष्णवी विद्या इंद्राला त्या उदारबुद्धि विश्वरूपानें कथन केली ॥ ४० ॥

**अध्याय सातवा समाप्त**

# अध्याय ८ वा

राजा म्हणाला, —हे भगवन्, ज्याच्या योगानें सुरक्षित झालेल्या इंद्रानें, वाहनासह शत्रूंच्या सेनाधिपतींचा सहज लीलेनें पराभव करून त्रैलोक्याच्या ऐश्वर्याचा उपभोग घेतला, तें नारायण नांवाचें कवच मला सांगा; व ज्या साहाय्यभूत सेनाधिपतीनें रक्षण केल्यामुळें इंद्रानें युद्धामध्यें शस्त्रपाणि शत्रूंचा पराभव केला तो कोण आणि तो पराभव कसा केला तेंहि सर्व सांगा ॥ १ ॥ २ ॥

शुकाचार्य म्हणाले, —हे राजा, त्वष्ट्याचा पुत्र म्हणून जो विश्वरूप त्याला पुरोहित केल्यावर इन्द्रानें त्याला प्रश्न केला. तेव्हां विश्वरूपानें त्याला जें नारायणनामक कवच सांगितलें, तें तूं आतां एकाग्रमनानें मजपासून श्रवण कर ॥ ३ ॥

विश्वरूप म्हणाला, —हे महेंद्रा, कोणाहि पुरुषाला भय प्राप्त झालें असतां त्यानें हातपाय धुऊन आचमन करावें व हातांत पवित्रक धारण करून उत्तरेकडे तोंड करून बसावें, आणि विष्णूच्या अष्टाक्षर व द्वादशाक्षर मंत्रांनीं अंगन्यास व करन्यास करून मौनव्रतधारण-पूर्वक शुचिर्भूत व्हावें. नंतर आपल्या शरिरावर नारायणमय कवच बांधावें. तें असेंकीं,—' ॐ **नमो नारायणाय**' ह्या अष्टाक्षर मंत्रांतील, प्रणवसंपुटित अशा ॐकारादि एकेक अक्षराचा अनुक्रमानें पाय, गुडघे, मांड्या, उदर, हृदय, उर, मुख आणि मस्तक या ठिकाणीं न्यास करावा; अथवा यकारादि एकेक अक्षराचा मस्तकापासून पायांपर्यंत उलटक्रमानें न्यास करावा ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥ नंतर ' **ॐ नमो भगवते वासुदेवाय**' ह्या द्वादशाक्षर मंत्रानें अंगुलि, अंगुष्ठपर्वें ह्या ठिकाणीं ॐकारापासून यकारापर्यंत बारा अक्षरांनीं करन्यास करावा; म्हणजे ॐकारसंपुटित अशा ॐकारादि एकेक अक्षराचा अनुक्रमानें दक्षिणतर्जनीपासून वामतर्जनीपर्यंत अंगुलींवर न्यास करून अवशिष्ट राहिलेल्या चार अक्षरांचा अंगुष्ठांच्या पहिल्या व शेवटल्या पर्वांवर न्यास करावा ॥ ७ ॥ नंतर ' **ॐ विष्णवे नमः** ' या मंत्रातील ॐकाराचा हृदयाच्या ठिकाणीं, विकाराचा मस्तकाच्या ठिकाणीं, षकाराचा भुवयांच्यामध्यें, णकाराचा शिखेच्या ठिकाणीं, वेकाराचा नेत्रांवर व नकाराचा सर्व सांध्यांवर न्यास करावा, आणि फट् ध्वनि करून सविसर्ग मकराचा सर्व दिशांच्या ठिकाणीं निर्देश करावा म्हणजे ' **ॐ मः अस्त्राय फट् इति दिग्बंधः** असें म्हणून दिग्बंधन करावें, म्हणजे तो ज्ञानी पुरुष मंत्रमूर्ति होतो. तो मंत्र **ॐविष्णवे नमः** असा होय ॥८॥९॥१०॥नंतर विद्या तेज आणि तप हीं ज्याची मूर्ति आहे व जो ऐश्वर्यादि सहा शक्तींनीं युक्त आहे, त्या ईश्वररूप परमात्म्याचें ध्यान करावें आणि पुढील नारायणकवचनामक मंत्राचा पाठ करावा ॥ ११ ॥ तो असा; ज्यानें गरुडाच्या पृष्ठभागावर आपलीं चरणकमळें ठेविलीं आहेत, ज्याला आठ भुजा आहेत, जो शंख, चक्र, गदा, ढाल, तलवार, बाण, धनुष्य आणि पाश हीं धारण करणारा आहे व जो

अणिमादि आठ ऐश्वर्यांनीं युक्त आहे, तो श्रीहरि सर्व काळीं माझें रक्षण करो ॥ १२ ॥ तसेंच उदकामध्यें जलजंतुसंघापासून व वरुणपाशापासून मत्स्यावतार धारण करणारा भगवान् माझें रक्षण करो; स्वेच्छेनें बटुवामनरूप धारण करणारा श्रीहरि भूमीवर माझें रक्षण करो व विश्वरूपी त्रिविक्रम आकाशामध्यें माझें रक्षण करो ॥ १३ ॥ तसाच, जो महान् अट्टहास करीत असतां दशदिशा नादानें भरून गेल्या व असुरस्त्रियांचे गर्भ पतन पावले, तो हिरण्यकशिपूचा शत्रू समर्थ नृसिंह, अरण्य व युद्धप्रसंग इत्यादि संकटस्थानीं माझें रक्षण करो ॥ १४ ॥ तसाच, ज्यानें आपल्या दंष्ट्रेच्या योगानें पृथ्वीचा उद्धार केला आहे व ज्याच्या अवयवांनीं यज्ञांचें निरूपण करितात, तो वराहरूपी परमात्मा मार्गामध्यें माझें रक्षण करो; तसेंच परशुराम पर्वताशिखरांवर आमचें रक्षण करो आणि लक्ष्मणासह भरताग्रज दाशरथि रामचंद्र दुसऱ्या देशांमध्यें आमचें रक्षण करो ॥ १५ ॥ त्याचप्रमाणें अविचारादिरूप भयंकर धर्म आणि सर्व प्रमाद ह्यांपासून श्रीनारायण माझें रक्षण करो, गर्वापासून नर माझें रक्षण करो, योगभ्रंशापासून योगनाथ असा दत्तात्रेय माझें रक्षण करो व कर्मबंधापासून सर्व गुणांचा अधिपति कपिलमहामुनि माझें रक्षण करो ॥ १६ ॥ तसेंच मदनापासून सनत्कुमार, मार्गामध्यें घडत असलेल्या देवांच्या अवज्ञेपासून हयग्रीव, देवपूजेंत घडणाऱ्या दोषांपासून देवर्षिश्रेष्ठ नारद आणि संपूर्ण नरकांपासून कूर्मरूप धारण करणारा श्रीहरि माझें रक्षण करो ॥ १७ ॥ अपथ्यांपासून भगवान् धन्वंतरी, थंडी, उष्ण इत्यादि द्वंद्वजन्य भयांपासून इंद्रियदमन करणारा ऋषभयोगी, लोकापवादापासून यज्ञमूर्ति परमात्मा, लोकांपासून होणाऱ्या उपघातापासून बलराम आणि क्रोधाधीन असलेल्या सर्पगणांपासून शेष माझें रक्षण करो ॥१८॥ अज्ञानापासून भगवान् वेदव्यास, पाखंडसमुदाय आणि प्रमाद ह्यांपासून बुद्ध आणि धर्मरक्षण करण्याकरितां ज्यानें मोठा अवतार धारण केला आहे तो भगवान् कल्कि काळाच्या मळरूपी कलीपासून माझें रक्षण करो ॥ १९ ॥ तसाच प्रात:काळीं पांच घटिका दिवसपर्यंत गदेच्या योगानें केशव, दहा घटिका दिवसपर्यंत हातामध्यें मुरली धारण करणारा गोविंद, पुढें पंधरा घटिका दिवसपर्यंत मोठी शक्ति, आयुध धारण करणारा नारायण, पुढें मध्यान्हकाळीं वीस घटिका दिवसपर्यंत हस्तामध्यें श्रेष्ठ चक्र धारण करणारा विष्णु, पुढें अपराह्णकाळीं पंचवीस घटिका दिवसपर्यंत भयंकर असें शार्ङ्गनामक धनुष्य धारण करणारा देव मधुसूदन त्यानंतर सायंकाळीं तीस घटिका दिवसपर्यंत ब्रह्मादि त्रिमूर्ति धारण करणारा माधव माझें रक्षण करो. प्रदोषकाळीं तीन घटिका रात्रीपर्यंत हृषीकेश, नंतर चौदा घटिका रात्रीपर्यंत व अर्धरात्रीच्या वेळीं म्हणजे सोळा घटिकेच्या रात्रीच्या काळापर्यंत एक पद्मनाभच माझें रक्षण करो ॥ २० ॥२१॥ नंतर उत्तररात्रीच्या वेळीं म्हणजे सव्वीस घटिका रात्रीपर्यंत, ज्याच्या वक्ष:स्थलावर श्रीवत्सलांच्छन चिन्ह आहे तो ईश्वर, त्यानंतर अरुणोदयाच्या वेळीं अठ्ठावीस घटिका रात्रीपर्यंत खड्ग धारण करणारा जनार्दन, त्यानंतर प्रभातकाळीं म्हणजे सूर्योदयापर्यंत श्रीदामोदर आणि दिवसाच्या व रात्रीच्या संधींच्या वेळीं भगवान् कालमूर्ति विश्वेश्वर माझें रक्षण करो ॥२२॥ हे सुदर्शनचक्रा, तुझी धांव प्रलयकाळच्या अग्नीसारखी तीक्ष्ण

आहे. भगवंतानें तुला प्रेरणा केली असतां, आमच्या सभोंवतीं तूं भ्रमण करीत करीत, जसा वायूच्या साहाय्यानें युक्त असलेला अग्नि वाळून गेलेलें गवत सत्वर जाळून टाकितो, त्याप्रमाणें तूं आमच्या शत्रुसैन्याला सर्वस्वी जाळून टाक ॥ २३ ॥ हे गदे, तुझ्या ठिणग्यांचा स्पर्श वज्रासारखा असह्य आहे. तूं अच्युताला प्रिय आहेस व मीहि अच्युताचा दास आहें, म्हणून कूष्मांड, वैनायक, यक्ष, राक्षस, भूत व ग्रह या माझ्या शत्रूंचें तूं सर्वस्वीं चूर्ण कर ॥ २४ ॥ हे पांचजन्य शंखा, कृष्णानें आपल्या मुखवायूनें तुला भरून टाकिलें असतां तूं भयंकर शब्द करून आमच्या शत्रूंच्या हृदयांना कांपवीत यातुधान, प्रमथ. प्रेत, मातृगण, पिशाच, ब्रह्मराक्षस व आणखीहि जे कोणी घोरदृष्टीनें युक्त असतील त्या सर्वांना पळवून लाव ॥ २५ ॥ हे तीक्ष्ण धारेनें युक्त अशा खड्गा, तुला ईश्वरानें प्रेरित केलें असतां तूं माझ्या शत्रूंच्या सैन्यांचा समूळ उच्छेद कर. हे ढाले, चंद्राकार शंभर मंडलांनीं युक्त अशी तूं माझ्या पापी शत्रूंच्या नेत्रांना झांकून टाक व उग्रदृष्टि लोकांचे नेत्र हरण कर ॥ २६ ॥ हे भगवन्, सूर्यादिक ग्रहांपासून, उल्कापातादि केतूंपासून, दुष्ट लोकांपासून, सर्प-वृश्चिकांपासून, उग्र दंष्ट्रांनीं युक्त अशा व्याघ्र-सिंहादि श्वापदांपासून, भूतप्रेतादिकांपासून आणि पातकांपासून आम्हांला जीं जीं भयें प्राप्त झालीं आहेत, तीं सर्व भयें आणि जे आमच्या इष्ट सिद्धीला अडथळे आणणारे यक्षराक्षसादिक असतील ते सर्वहि, तुझ्या नांवांच्या, रूपांच्या व अस्त्रांच्या कीर्तनानें सत्वर क्षय पावोत ॥ २७ ॥ २८ ॥ त्याचप्रमाणें स्तोत्रांनीं स्तविलेला जो वेदमूर्ति प्रभु भगवान् गरुड, तो माझें सर्व संकटांपासून रक्षण करो व विष्वक्सेननामक मुख्य पार्षदहि आपल्या नांवांनीं माझें सर्व संकटांपासून रक्षण करो ॥ २९ ॥ तशींच श्रीहरीचीं नामें, रूपें, वाहनें व आयुधें, आमची बुद्धि, इंद्रियें, मन आणि प्राण ह्यांचें सर्व संकटांपासून रक्षण करोत ॥ ३० ॥ तसेंच मूर्तामूर्त असें जें जगत् तें सर्व वस्तुतः भगवानच आहे. हें जर वास्तविक सत्य असेल, तर त्या सत्याच्या योगानें आमचे सर्व उपद्रव नाश पावोत ॥ ३१ ॥ सर्वत्र एकरूप आत्मस्वरूपाचें बारंवार चिंतन करणाऱ्या ज्ञानी पुरुषांना ईश्वर स्वतः भेदरहित असतांहि आपल्या मायेच्या योगानें भूषणें, आयुधें, मूर्ति व नामें ह्या शक्ति धारण करीत आहे असें भासतें व हें जर यथार्थ असेल तर त्याच सत्यभूत प्रमाणाच्या योगानें सर्वज्ञ व सर्वगत असा भगवान् श्रीहरि आपल्या सर्व स्वरूपांनीं आमचें सर्व ठिकाणीं सर्वदा रक्षण करो ॥ ३२ ॥ ३३ ॥ आणि ज्यानें आपल्या प्रभावानें सर्वांचें तेज गिळून टाकिलें आहे व जो आपल्या अट्टहासाच्या योगानें लोकांपासून होणारें भय दूर करीत आहे, तो भगवान् नारसिंह, मुख्य दिशा, उपदिशा, वरचे प्रदेश, खालचे प्रदेश, सभोंवतालचा भाग, तसेंच आंत व बाहेर अशा सर्व ठिकाणीं आमचें रक्षण करो ॥ ३४ ॥ हे इंद्रा, मी तुला हें नारायणात्मक कवच सांगितलें आहे. आतां याच्या योगानें तूं कवचयुक्त होऊन अनायासानें दैत्यसेनाधिपतींचा पराजय करिशील ॥ ३५ ॥ हें कवच धारण करणारा पुरुष,ज्याला ज्याला डोळ्यांनीं पाहतो, किंवा आपल्या पायानें स्पर्श करितो, तो तो प्राणीसुद्धां भयापासून तत्काळ मुक्त होतो ॥ ३६ ॥ आणि ही नारायणकवचात्मक विद्या

धारण करणाऱ्या पुरुषाला तर राजे, चोर व ग्रह इत्यादिकांपासून आणि व्याघ्रादिकांपासून कोठूनहि व कधींहि भय प्राप्त होत नाहीं ॥ ३७ ॥ हे इंद्रा, पूर्वी कौशिक नांवाचा कोणी एक ब्राह्मण हें कवच धारण करीत होता; त्यानें योगधारणेनें निर्जल प्रदेशामध्यें आपल्या देहाचा त्याग केला ॥ ३८ ॥ पुढें एके वेळीं जेथें त्या ब्राह्मणानें देहत्याग केला होता, त्या स्थानावरून आकाशांतून विमानांत बसून स्त्रियांनीं परिवेष्टित असा गंधर्वाधिपति चित्ररथ जात असतां, तो विमानासह अधोमुख होऊन आकाशांतून एकाकी खालीं पडला. तेव्हां 'तूं ह्या ब्राह्मणाच्या अस्थि गंगेंत टाकशील तर आपल्या गंधर्वलोकांत जाण्यास समर्थ होशील' असें वालखिल्य ऋषींनीं त्याला सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें त्याच्या अस्थि घेऊन पूर्ववाहिनी सरस्वती नदीमध्यें टाकिल्या व तेथें स्नान करून तो त्या कौशिक ब्राह्मणाच्या प्रभावाविषयीं आश्चर्य करीत विमानांत बसून पुनः आपल्या गंधर्वलोकाप्रत निघून गेला ॥ ३९ ॥ ४० ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्राजा, जो पुरुष योग्य काळीं आदरपूर्वक हें नारायणात्मक कवच श्रवण करितो किंवा धारण करितो त्याला सर्व भूतें पूज्य मानितात आणि तो सर्व भयांपासून मुक्त होतो ॥ ४१ ॥ असो. विश्वरूपापासून इंद्रानें ही विद्या प्राप्त करून घेतली व तिच्या योगानें युद्धामध्यें दैत्यांना जिंकून त्रैलोक्याच्या ऐश्वर्याचा उपभोग त्यानें घेतला ॥ ४२ ॥

**आठवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ९ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे भरतकुलोत्पन्ना राजा, त्या विश्वरूपाला सोमपीथ नांवाचें सोमपान करण्याचें, सुरापीथ नांवाचें सुरापान करण्याचें व अन्नाद नांवाचें अन्न भक्षण करण्याचें अशीं तीन शिरें होतीं ' असें आम्हीं ऐकिलें आहे ॥१ ॥ हे राजा, तो विश्वरूप यज्ञामध्यें उघड रीतीनें विनयपूर्वक देवांना उच्च स्वरानें हाक मारून हविर्भाग देत असे; कारण देव त्याचे पितरच होते ॥ २॥ पण त्याची माता असुरकन्या असल्यामुळें तिच्या प्रेमामुळें तो असुरांसहि अनुकूल होता; म्हणून देवांचा याग करीत असतांना असुरांनाहि तो गुप्त रीतीनें कोणत्या तरी उपयानें हविर्भाग पोचवीत असे ॥ ३ ॥ विश्वरूपानें देवांसंबंधानें केलेला हा अपराध व धर्मांतील त्याचें कपट इंद्राला समजलें, तेव्हां हा असुरांना वाढवून आमचा घात करील असें मनांत म्हणून तो भयभीत झाला आणि त्यानें क्रोधानें त्याचीं तिन्ही शिरें तोडून टाकिलीं ॥ ४ ॥ त्या वेळीं त्याचें जें सोमपीथ नांवाचें मस्तक होतें, त्याचा कवडा नावाचा पक्षी, सुरापीथ नांवाच्या मस्तकाचा चिमणी नांवाचा पक्षी आणि अन्नाद नांवाच्या मस्तकाचा तित्तिरि म्हणजे लावापक्षी असे झाले ॥ ५ ॥ पुढें इंद्र जरी त्या ब्रह्महत्येचें निवारण करण्यास समर्थ होता तथापि त्यानें ती आपल्या ओंजळींत घेतली संवत्सरपर्यंत तसाच राहिला. संवत्सराच्या अंतीं, हे ' ब्रह्मघातक्या ' म्हणून सर्व प्राणी त्याला हांक मारूं लागले. तेव्हां लोकापवाद दूर करण्याकरितां त्यानें ती ब्रह्महत्या, भूमि, उदक, वृक्ष आणि स्त्रिया ह्यांना चार भाग करून वांटून दिली ॥ ६ ॥ त्या वेळीं ' जर माझ्यावर खणलेला खळगा आपोआप भरून येईल तर मी ब्रह्महत्येचा चौथा भाग ग्रहण करीन ' अशा बोलीनें भूमीनें चौथा भाग ग्रहण केला. त्या ब्रह्महत्येचें स्वरूप भूमीवर खाऱ्या मातीमध्यें कोठेंकोठें उखररूपानें दृष्टीस पडतें ॥ ७ ॥ तसेंच 'छेदन केलें असतां फिरून अंकुर उत्पन्न व्हावेत ' असा वर मागून घेऊन वृक्षांनीं ब्रह्महत्येचा चतुर्थांश भाग ग्रहण केला. तें ब्रह्महत्येचें रूप त्यांचे ठिकाणीं डिंकाच्या रूपानें दृष्टीस पडतें. ॥ ८ ॥ त्याचप्रमाणें 'गर्भाला पीडा न होतां प्रसूतिकाळपर्यंत पुरुषाशीं निरंतर संभोग व्हावा ' हा वर मागून घेऊन स्त्रियांनीं ब्रह्महत्येचा चतुर्थ भाग ग्रहण केला; तें पातक त्यांच्या ठिकाणीं प्रत्येक महिन्यामध्यें रजोरूपानें दृष्टीस पडतें ॥ ९ ॥ तसेंच ' दुग्धादि पदार्थांत आपलें मिश्रण केलें असतां त्या पदार्थांची वृद्धि व्हावी, असा वर मागून घेऊन जलानें त्या पातकाचा चतुर्थभाग ग्रहण केला. तें पातक बुडबुडे आणि फेंस ह्यांच्या रूपानें पाण्यामध्यें दृष्टीस पडतें; म्हणून बुडबुडे, फेंस वगैरे बाहेर टाकून नंतर त्या उदकानें स्नानादिक कर्में करावीं; म्हणजे तें उदक पापनाश करणारें होतें ॥ १० ॥ असो. नंतर आपल्या पुत्राचा वध झाला असें पाहून त्वष्ट्यानें ' हे इंद्रशत्रो, विलंब न करितां वृद्धिंगत हो आणि शत्रूचा वध कर ! ' असें उच्चारून इंद्राच्या वधार्थ शत्रु उत्पन्न करण्याकरितां अग्नीमध्यें हवन केलें ॥११॥ तेव्हां लगेच जसा प्रलयकाळीं

सर्व लोकांचा संहार करण्याकरितां काळ प्रगट होतो, त्याप्रमाणें दक्षिणाग्नीपासून भयंकर रूप धारण करणारा वृत्रासुर प्रगट झाला ॥ १२ ॥ हे राजा, तो वृत्रासुर प्रतिदिवशीं आपल्या सभोंवतीं बाणांच्या फेंकीइतका वाढत असून अग्नीनें जळलेल्या पर्वतासारखा उंच होता. त्याचें तेज संध्याकाळच्या मेघसमुदायासारखें काळें होतें, त्याची शिखा व श्मश्रू तापलेल्या तांब्याप्रमाणें लाल होत्या आणि त्याचे नेत्र मध्याह्नकाळाच्या सूर्याप्रमाणें उग्र होते ॥ १३ ॥ ॥ १४ ॥ तो पृथ्वी व आकाश ह्यांना आपल्या देदीप्यमान त्रिशूळावर आरोपित करूनच कीं काय, उच्च स्वरानें गर्जना करीत व पायानें पृथ्वी कंपित करीत नृत्य करीत आहे, असा भास होत होता ॥ १५ ॥ तो आकाशाचें प्राशनच करीत आहे कीं काय, जिव्हेच्या योगानें नक्षत्रांना चाटीतच आहे कीं काय आणि त्रैलोक्याला गिळूनच टाकीत आहे कीं काय अशा आपल्या मोठ्या भयंकर दाढेनें युक्त व पर्वताच्या गुहेप्रमाणें खोल असलेल्या मुखानें वारंवार जांभया देत होता. त्या वृत्रासुराला पाहून सर्व लोक भयभीत झाले व दशदिशांकडे पळून जाऊं लागले ॥ १६ ॥ १७ ॥ हे राजा, त्वष्ट्याच्या त्या तमोगुणी पुत्रानें हे सर्व लोक व्यापून टाकिले, म्हणून त्या अतिभयंकर पापी असुराला वृत्र असें नांव पडलें ॥ १८ ॥ त्या वेळीं आपल्या गणांसह देवश्रेष्ठींनीं त्याच्या अंगावर धावून आपआपल्या दिव्य शस्त्रास्त्र-समुदायांनीं त्याला प्रहार केला; परंतु त्यानें तीं सर्व शस्त्रास्त्रें गिळून टाकिलीं ॥ १९ ॥ नंतर ग्रस्ततेज झालेले व वृत्रासुरानें त्रैलोक्य व्याप्त केल्यामुळें ज्यांना कोठेंहि जातां येईना असे ते सर्व देव विस्मित व खिन्न होऊन त्याच ठिकाणीं एकाग्र अंत:करणपूर्वक अंतर्यामीं आदिपुरुषाची स्तुति करूं लागले ॥ २० ॥

देव म्हणाले,—अहो, वायु, आकाश, अग्नि, उदक व पृथ्वी हीं पंचमहाभूतें व त्यांनीं निर्माण केलेलें त्रैलोक्य, त्याचे अधिपति ब्रह्मादिक व त्यापेक्षांहि अलीकडचे जे आम्हीं सर्व देव ते ज्या काळाला भिऊन त्याची पूजा करितों तो काळहि ज्याला भितो त्या परमेश्वराकडून आमचें रक्षण होवो ॥ २१ ॥ कारण, सर्वत्र समदृष्टीनें पाहणारा, आत्म-स्वरूपाच्या लाभामुळें नित्य पूर्णमनोरथ असणारा, रागादि विकारांपासून अलिप्त व अहंकार-रहित असा जो परमेश्वर त्याच्यावांचून दुसऱ्याकडे जो अडाणी मनुष्य आपल्या रक्षणासाठीं जातो, तो कुत्र्याची शेपटी धरून समुद्र तरून जाण्याचीच इच्छा करितो असें म्हटलें पाहिजे ॥ २२ ॥ ज्याच्या महाशृंगाला आपली पृथ्वीरूपी नाव बांधून सत्यव्रत मनु अनायासानें संकटांतून तरून गेला, तोच मत्स्यमूर्ति भगवान् शरण आलेल्या आमचें, दुस्तर अशा वृत्रासुराच्या भयापासून खरोखर रक्षण करील ॥ २३ ॥ पूर्वीं मोठ्या जोरानें उठलेल्या वाऱ्यानें उत्पन्न केलेल्या लाटांच्या शब्दामुळें भयंकर झालेल्या प्रलयकालीन उदकामध्यें नाभिकमळापासून पडल्यासारखा झालेला व आपण एकटेच आहों असें वाटणारा ब्रह्मदेवहि ज्याच्यायोगानें त्या भयापासून मुक्त झाला, तोच भगवान् आमचा तारक असो ॥ २४ ॥ ज्या अद्वितीय ईश्वरानें आपल्या मायेनें आम्हांस उत्पन्न केलें आहे, ज्यानें अनुग्रह केला असतांच आम्ही विश्व उत्पन्न करितों आणि स्वतंत्र ईश्वरच आहोंत असा अभिमान धारण करणारे आम्ही, पूर्वींच अंतर्यामिरूपानें त्या त्या कार्याविषयीं आमची प्रेरणा करणाऱ्या

ज्या ईश्वराचें स्वरूप जाणत नाहीं, जो वस्तुतः निर्विकार असून देव, ऋषि, पश्वादि ज्ञानहीन जाति व मानव इत्यादि ठिकाणीं आपल्या मायेच्या योगानें उपेंद्र, परशुराम, मत्स्य, राम इत्यादि रूपांनीं अवतार धारण करून शत्रूंनीं अत्यंत पीडा दिलेल्या आमचें, आपले असें समजून प्रत्येक युगामध्यें संरक्षण करितो, जो विश्वाहून भिन्न असूनहि विश्वरूपी आहे, जो प्रकृतिरूपी व पुरुषरूपी असल्यामुळें विश्वाचें कारण आहे, जो सर्वांचा आत्मा असून परम दैवत आहे आणि जो शरण जाण्यास योग्य आहे, त्याच देवाला आम्ही सर्व शरण जातों आणि तोच महात्मा आम्हां स्वभक्तांचें कल्याण करील ॥ २५ ॥ २६ ॥ २७ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें ते देव स्तुति करीत असतां शंख, चक्र व गदा धारण करणारा भगवान् प्रथम त्या देवांच्या पश्चिम दिशेला प्रगट झाला आणि नंतर त्यांच्यासमोर दिसूं लागला ॥२८॥ हे राजा, श्रीवत्सलांछन व कौस्तुभमणि या दोन चिन्हां-वांचून भगवंतासारख्या सर्व लक्षणांनीं युक्त असे सोळा पार्षदगण त्याच्या भोंवतीं त्याची सेवा करीत होते. विकसित झालेल्या शरदृतूंतील कमळाप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत अशा त्या भगवंताला पाहून त्याच्या दर्शनापासून झालेल्या आनंदानें भरून गेलेल्या सर्व देवांनीं त्याला भूमीवर साष्टांग नमस्कार घातला आणि कांहीं वेळानें उठून ते देव त्याची पुनरपि स्तुति करूं लागले ॥२९॥३०॥ देव म्हणाले,—हे प्रभो, स्वर्गादि फळें उत्पन्न करण्याकरितां यज्ञरूप सामर्थ्यानें तूं युक्त आहेस व तीं फलें देणारा काळहि तूंच असून त्या यज्ञांचा घात करणाऱ्या दैत्यांवर तूं आपलें चक्र फेंकितोस. तुझा पराक्रम दर्शविणारीं तुझीं पुष्कळ नांवें आहेत. तुला नमस्कार असो ॥३१॥ हे विधात्या, सात्त्विकादिक तिन्ही गतींचें परमस्थान असें जें तिहींचें नियंत्रण करणारें तुझें निर्गुण स्वरूप, तें जाणण्यास अलीकडच्या सृष्टींतील कोणीहि प्राणी समर्थ नाहीं. याकरितां आम्ही तुला केवळ नमस्कार करितों ॥ ३२ ॥ हे भगवंता, हे नारायणा, हे वासुदेवा, हे आदिपुरुषा, हे महानुभावा, हे शुद्धधर्मा, हे परम-कल्याणा, हे परमदयाळा, हे केवला, हे जगदाधारा, हे लोकैकनाथा, हे सर्वेश्वरा, हे लक्ष्मीनाथा, हे परमहंसा, संन्याशांनीं अष्टांगयोगानें चित्ताची एकाग्रता करून अभ्यासिलेला जो भगवद्भजनरूप परमहंस धर्म, ज्याच्यायोगानें अज्ञान नाहींसें झालें आहे, अशा चित्तामध्यें प्रगट झालेल्या अंतर्यामिरूपाच्या ठिकाणीं स्वतःच ज्याच्या आनंदरूपाचा अनुभव येतो, तोच तूं आहेस ॥ ३३ ॥ हे परमेश्वरा, तुझा हा क्रीडेचा प्रकार खरोखर दुर्बोधच आहे. कारण, तूं निराश्रय, शरीररहित, आमच्या साहाय्याची अपेक्षा न करणारा आणि निर्गुण असून आपल्या निर्विकार स्वरूपानेंच हें सगुण विश्व उत्पन्न करून त्याचें रक्षण करितोस; आणि शेवटीं ह्याचा संहारहि करितोस ॥ ३४ ॥ हे परमेश्वरा, जसा एखादा पुरुष इहलोकीं गृहादि निर्माण करून त्या ठिकाणीं परतंत्रतेमुळें आपण केलेल्या पुण्यपापांचें फळ भोगतो, त्याप्रमाणें ब्रह्मरूप असा तूं जीवरूपानें गुणकार्यरूप देहामध्यें प्रविष्ट होऊन, पारतंत्र्यानें पुण्यपापांचें फळ भोगतोस किंवा स्वस्वरूपीं रममाण होऊन शांतस्वभावानें आणि कधींहि लोप न पाव-णाऱ्या चैतन्यशक्तीनें युक्त असा उदासीनपणानें असतोस, हें आम्हांला खरोखर समजत नाहीं ॥ ३५ ॥ तुझ्या षड्गुणैश्वर्यसंपन्नस्वरूपीं पूर्वोक्त दोन्ही गोष्टी विरुद्ध नाहींत. कारण,

तूं अपरिमित गुणसमुदायांचा निधि व स्वतंत्र असा, ईश्वर असल्यामुळें तुझें माहात्म्य अतर्क्य आहे आणि वस्तुस्वरूपाला स्पर्शहि न करणारे असे जे विकल्प, वितर्क, विचार आणि कुतर्क यांनीं युक्त असलेल्या शास्त्रांनीं व्याकुळ झालेलें अंत:करणच त्या दुराग्रहाचा आश्रय आहे. त्याच्या योगानें वाद करणाऱ्या लोकांच्या विवादाला ज्या तुझे स्वरूप गोचर होत नाहीं, आणि हा सर्व मायामय संसार जेथें शांत झाला आहे, त्या तुझ्या निर्लेप स्वरूपामध्यें याची स्थापना केली असतां कोणता बरें कर्तृत्वादिक प्रकार संभवणार नाहीं ? आणि त्यांतूनहि कर्तृत्वादिक धर्म जर वस्तुतः तुझ्या ठिकाणीं खरे असतील तर विरोध येईल; परंतु ते धर्म तुझ्या ठिकाणीं खरे मुळींच नाहींत. कारण, तूं दोन्ही स्वरूपांहून निराळाच आहेस ॥ ३६ ॥ हे परमात्म्या, जसा दोरीचा तुकडा त्याचें यथार्थ ज्ञान असणाऱ्या लोकांना दोरीच्या रूपानें भासत असतांहि सर्पादिविषयक बुद्धि असणाऱ्या लोकांना सर्पादि भयंकररूपानें भासतो, त्याचप्रमाणें यथार्थ बुद्धीच्या लोकांना तूं केवळ निर्गुण स्वरूपानें भासत असतांहि भ्रांत बुद्धीच्या लोकांना कर्तृत्वादिरूपानें भासतोस. तात्पर्य, तुझ्या मायेनें तुझ्या ठिकाणीं लोकांची जसजशी मति होईल, तसतसा तूं त्यांना अनुग्रह करणारा किंवा निग्रह करणारा भासतोस ॥ ३७ ॥ विचार करून पाहिलें असतां नाना प्रकारच्या रूपांनीं प्रतीत होणारा तूंच सर्व वस्तूंमध्यें सद्रूपानें स्थित आहेस. सर्व जगताला कारण असलेल्या महत्तत्त्वादिकांनाहि कारणभूत असा सर्वेश्वरहि तूंच आहेस. सर्व जीवांच्या ठिकाणीं अंतर्यामिरूपानें तूं राहात असल्यामुळें सर्व विषयांच्या प्रकाशांनीं तुझें अनुमान होत आहे; आणि तुझ्यावांचून इतर वस्तूंचा निषेध करणाऱ्या सर्व श्रुतींनींहि सत्यत्वानें तुझें एकाचेंच वर्णन केलें आहे ॥ ३८ ॥ हे मधुसूदना, एकवार आस्वाद घेतलेल्या तुझ्या माहात्म्यरूप अमृतरससमुद्राचा जो बिंदु, त्याच्या योगानें आपल्या मनामध्यें स्रवत असलेल्या निरंतर सुखामुळें पाहिलेल्या, व ऐकिलेल्या अल्प व भासमान सुखाची ज्यांना विस्मृति पडली आहे व म्हणूनच सर्वांचा आत्मा असल्यामुळें सर्वांना प्रिय आणि सर्वांचा हितकर्ता अशा तुज भगवंताच्या ठिकाणीं ज्यांचें मन निरंतरसुखामुळें तृप्त असतें, जे रागादि विकारांपासून अलिप्त असून आपल्या पुरुषार्थाविषयीं तत्पर आहेत आणि तूंच ज्यांना प्रिय आहेस, असे हे एकनिष्ठ परम भगवद्भक्त, जी सेवा केली असतां फिरून हें संसारभ्रमण प्राप्त होत नाहीं; ती तुझ्या चरणकमलांची नित्यसेवा कशी बरें सोडून देतील ? ॥ ३९ ॥ हे त्रिविक्रमा, हे त्रैलोक्यनायका, तूंच त्रैलोक्याचा आत्मा व उत्पत्ति-स्थान असून तुझी लीला त्रैलोक्यामध्यें मनोहर आहे व दैत्य आणि दानव इत्यादि सर्व तुझ्याच विभूति आहेत. यास्तव हे भगवन्, त्यांचा हा उत्कर्षकाळ नाहीं, असें समजून ज्याप्रमाणें पूर्वी देव, नर, पशु व मिश्रजाति ह्यांचीं रूपें आपल्या मायेच्या योगानें धारण करून त्या दैत्यांना अपराधानुरूप तूं दंड केलास, त्याप्रमाणें आतांहि हे दंड धारण करणाऱ्या देवा, जर तूं इच्छीत असशील तर ह्या त्वष्ट्याच्या पुत्राचा वध कर ! ॥ ४० ॥ परंतु प्रथम हे पित्या, हे पितामहा, हे निष्पापा, तुझ्या चरणकमलांच्या ध्यानानेंच ज्या आमच्या हृदयामध्यें तूं प्रेमरूप शृंखला बांधून ठेविली आहेस, आणि त्यांत आपली मूर्ति

प्रगट करून ज्यांना तूं आपले असें म्हणवून स्वीकारिलें आहेस, त्या तुला नम्र असणाऱ्या व तुझे भक्त अशा आमच्या अंत:करणांतील ताप तूं आपल्या सदय, निर्मळ, मनोहर व शीतल अशा सहास्य अवलोकनानें आणि कृपेमुळेंच बाहेर निघालेल्या गोड शब्दरूपी अमृताच्या धारेनें शांत कर ॥ ४१ ॥ हे भगवन्, ज्याप्रमाणें अग्नीचेच अंश असलेलीं किटाळें इत्यादिकांनीं अग्नीला प्रकाश मिळत नाहीं, त्याप्रमाणें आम्ही आपल्या कार्याविषयीं तुला विशेष काय सांगावें ? कारण, सर्व जगताची उत्पत्ति, स्थिति व लय ह्यांना निमित्त असणाऱ्या दिव्य मायेच्या योगानें आपली क्रीडा चालविणारा तूं सर्व जीवसमूहांच्या हृदयांमध्यें ब्रह्मरूपानें आणि प्रकृतिरूपानें देश, काल, देह व त्याच्या विशेष अवस्था ह्यांचें उल्लंघन न करितां उपादानकारणरूपानें व प्रकाशकरूपानें त्यांचा अनुभव घेणारा, सर्वांच्या बुद्ध्यादिकांचा साक्षी, आकाशासारख्या अलिप्त असलेल्या शरिरानें युक्त व शुद्ध सत्त्वमूर्ति असा तूं साक्षात् परब्रह्मरूप आहेस ॥ ४२ ॥ तूं अचिंत्य, ऐश्वर्यानें संपन्न व सर्वांचा परमगुरु असून तुला शरण आलेल्या भक्तांना नाना प्रकारच्या दु:खांसह प्राप्त होणारे संसारांतील परिश्रम तुझ्या चरणकमलाची छाया दूर करिते. त्या छायेच्या आश्रयाला आम्ही ज्या कार्याच्या इच्छेनें प्राप्त झालों आहों, तें आमचें कार्य तूं आपण होऊनच संपादन कर ॥ ४३ ॥ हे सच्चिदानंदरूप परमेश्वरा, ज्यानें आमचीं तेजें, अस्त्रें व आयुधें गिळून टाकिलीं आहेत, त्या त्रैलोक्याला ग्रासून टाकणाऱ्या वृत्रासुराचा तूं सत्वर वध कर ॥ ४४ ॥ हृदयाकाश हें तुझें निवासस्थान असून सर्व बुद्ध्यादिकांचा तूंच साक्षी आहेस. तूं सदानंदरूप, अनादि व शुद्ध असून तुझें यश सर्वप्रिय आहे. सज्जन लोक सर्वसंग-परित्याग करून तुझाच स्वीकार करितात व संसाररूप मार्गामध्यें असलेल्या जनाला तुझा आश्रय प्राप्त झाला असतांच शेवटीं अत्यंत सुख प्राप्त होतें. अशा तुज हरीला नमस्कार असो ॥ ४५ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें श्रीहरीची आदरपूर्वक स्तुति करून देवांनीं त्याला संतुष्ट केलें असतां, आपलें स्तोत्र श्रवण करून श्रीहरि त्यांना उत्तर देऊं लागला ॥ ४६ ॥ भगवान् म्हणाला, —हे सुरश्रेष्ठ हो, माझ्या स्तुतीनें युक्त अशा या तुमच्या ज्ञानाच्या योगानें मी तुम्हांवर प्रसन्न झालों आहें. कारण, त्या ज्ञानाच्या योगानेंच पुरुषांना माझ्या ठिकाणीं मी परमात्मा संसाररहित आहें अशी स्मृति व भक्ति प्राप्त होत्ये ॥ ४७ ॥ हे सुरश्रेष्ठ हो, मी प्रसन्न झालों असतां पुरुषाला दुर्लभ असें काय आहे ? तथापि माझ्या ठिकाणीं ज्याला एकनिष्ठ मति प्राप्त झाली आहे, तो तत्त्ववेत्ता पुरुष माझ्या सेवेवांचून दुसऱ्या कशाचीच इच्छा करीत नाहीं ॥ ४८ ॥ विषयांच्या ठिकाणीं तत्त्वबुद्धि धारण करणारा कृपण पुरुष आपलें खरें कल्याण जाणत नाहीं. अशा त्या विषयेच्छु अज्ञानी पुरुषाला जर कोणी ते विषयच प्राप्त करून देईल, तर तोही त्याच्यासारखाच अज्ञानी होय ॥ ४९ ॥ जसा अपथ्य पदार्थांची इच्छा करणाऱ्या रोग्याला, उत्तम वैद्य, तो कुपथ्यकारक पदार्थ देत नाहीं, त्याप्रमाणें स्वत: कल्याण जाणणारा ज्ञानी पुरुष अज्ञ जनाला प्रवृत्तिमार्गाचा उपदेश करीत नाहीं ॥ ५० ॥ हे इंद्रा, तुमचें कल्याण असो.

आतां तुम्ही दधीचिनामक ऋषीजवळ जा; आणि विद्या, व्रत व तप ह्यांच्या योगानें दृढ झालेल्या त्याच्या शरिराची त्याच्याजवळच याचना करा; विलंब करूं नका ॥ ५१ ॥ हे इंद्रा, अश्वशिरस् * नांवाचें प्रसिद्ध असलेलें जें शुद्ध ब्रह्म तें दधीचि ऋषीला माहीत आहे. तें त्यानें अश्विनीकुमारांना उपदेशिलें व त्याच्या योगानें त्यांना जीवन्मुक्तत्व प्राप्त झालें ॥ ५२ ॥ आणि त्याचप्रमाणें त्या अथर्वणवेदी दधीचि ऋषीला माझें स्वरूप असें नारायणनामक अभेद्य कवचहि माहीत आहे. कारण, त्यानें तें त्वष्ट्याला दिलें. पुढें त्वष्ट्यानें तें आपल्या विश्वरूपनामक पुत्राला अर्पण केलें, आणि तेंच त्या विश्वरूपापासून तूं धारण केलें आहेस; म्हणून ह्याप्रमाणें विद्येच्या योगानें दृढ झालेल्या त्या दधीचि ऋषीच्या शरिराची तुम्हीं त्याच्याजवळ जाऊन याचना करा ॥ ५३ ॥ हे देवेंद्रा, तो धर्मज्ञ असल्यामुळें याचना केली असतां, तो तुम्हांला, त्यांतूनहि विशेषत: अश्विनी-कुमारांना आपल्या अस्थि देईलच. नंतर त्यांच्यापासून विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें एक वज्रनामक श्रेष्ठ आयुध तयार होईल ॥५४॥ नंतर माझ्या तेजानें वाढलेला असा तूं त्या वज्राच्या योगानें वृत्रासुराचें शिर कापून टाक. त्याचा वध झाला म्हणजे पुन: तुम्हांला तेज, अस्त्रें, आयुधें आणि संपत्ति हीं सर्व प्राप्त होतील. यास्तव हे देव हो, मोठा देह धारण करणारा तो त्रैलोक्यभक्षक वृत्रासुर आपला वध करील असें तुम्हीं मनांत सुद्धा आणूं नका. कारण, मजविषयीं निष्ठावंत असलेल्या पुरुषांची कोणीहि हिंसा करीत नाहींत. तुमचें कल्याण असो ॥ ५५ ॥

---

* एके दिवशीं अश्विनीकुमार दधीचीजवळ ही ब्रह्मविद्या मागण्याकरितां आले; परंतु ही विद्या अश्विनीकुमारांना सांगूं नका, सांगितल्यास तुमचा शिरच्छेद करीन, अशी इंद्रानें दधीचीला धमकी देऊन ठेविल्यामुळें दधीचीनें शिरच्छेदाच्या भीतीनें प्रथमच आपलें शिर बाजूला कापून ठेवून अश्वशिर म्हणजे घोड्याचें मस्तक धारण केलें व ही ब्रह्मविद्या अश्विनीकुमारांना सांगितली. अशा रीतीनें अश्वशिर धारण करून ही विद्या सांगितल्यामुळें ह्या विद्येला अश्वशिरस असें नांव प्राप्त झालें.

## नववा अध्याय समाप्त

# अध्याय १० वा

शुकाचार्य म्हणाले,–हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें इंद्राला सांगून भगवान् विश्वपालक श्रीहरि सर्व देव पाहत असतां तेथेंच गुप्त झाला ॥ १ ॥ हे भरतकुलोत्पन्ना राजा, इकडे भगवंतानें सांगितल्याप्रमाणें देवांनीं त्या अथर्ववेदी महर्षि दधीचीजवळ जाऊन याचना केली असतां, तो आनंदित झाला आणि त्या देवांच्या मुखांतून धर्म श्रवण करण्याच्या इच्छेनें त्यांचें मागणें अमान्य करीत आहे कीं काय असें दर्शवीत म्हणाला ॥ २ ॥ 'हे देव हो, तुम्ही सत्त्वगुणात्मक आहां; इंद्रियांच्या देवता आहां. तेव्हां शरीर धारण करणाऱ्या प्राण्यांना अंतकाळीं मूर्च्छा उत्पन्न करणारें दु:सह दु:ख प्राप्त होतें, तें तुम्हीं जाणत नाहीं काय? ॥ ३ ॥ अहो देव हो, जगण्याची इच्छा करणाऱ्या जीवांना या लोकीं देह अत्यंत प्रिय असल्यामुळें त्याची याचना करणाऱ्या विष्णूला सुद्धां तो देण्यास कोणाला बरें उत्साह वाटेल? ॥ ४ ॥

देव म्हणाले,—हे ब्रह्मनिष्ठा, ज्यांचीं कर्में सत्कीर्तिमान् लोकांनीहि वर्णन करण्यासारखीं आहेत, त्या तुम्हांसारख्या प्राणिमात्रांवर दया करणाऱ्या महापुरुषांना त्याग करण्यास अशक्य अशी वस्तु कोणती आहे? ॥ ५ ॥ हे ऋषे, स्वार्थाविषयीं तत्पर असलेल्या लोकांना खरोखर दुसऱ्याचें संकट समजत नाहीं. जर समजेल तर ते याचनाच करणार नाहींत. तसेंच ज्याच्याजवळ याचना केली, तो जर देण्यास समर्थ असून दुसऱ्याचें संकट जाणणारा असेल, तर तो नाहीं असें कधींच म्हणणार नाहीं ॥ ६ ॥

ऋषि म्हणाला,—हे देव हो, तुमच्या मुखांतून धर्म श्रवण करण्याच्या इच्छेनेंच मी खरोखर नाहीं असें म्हटलें. असो, आतां मी, कधीं तरी मला सोडूनच जाणाऱ्या या प्रिय देहाचा तुमच्याकरितां त्याग करितों ॥ ७ ॥ हे नाथ हो, जो पुरुष भूतांवर दया करण्यासाठीं आपल्या अनित्य देहाच्या योगानें धर्म किंवा कीर्ति ह्यांपैकीं कांहींच संपादन करण्यास इच्छीत नाहीं, त्याचा वृक्षादि स्थावर वस्तूहि खेद करीत असतात ॥ ८ ॥ यास्तव प्राण्यांना दु:ख झालें असतां ज्याला स्वत:ला दु:ख होतें व त्यांना हर्ष झाला असतां ज्याला हर्ष होतो, त्या पुरुषाचा जो धर्म तोच अक्षय धर्म होय. कारण, सत्कीर्तिमान् लोकांनीं त्याच धर्माचें सेवन केलें आहे ॥ ९ ॥ अरेरे! ज्यांचा आपल्या स्वत: करितां तिळमात्रहि उपयोग होत नाहीं, ज्यांना कोल्हींकुत्रीं खाऊन टाकणार व ज्यांचा एक क्षणभरहि भरंवसा नाहीं, अशा द्रव्य, पुत्रादिक बांधव आणि देह यांच्या योगानें मनुष्यानें कोणावरहि उपकार न करावा, ही किती तरी दैन्याची व दु:खाची गोष्ट आहे! ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें निश्चय केलेल्या त्या आथर्वण दधीचिऋषीनें परब्रह्मरूप भगवंताच्या ठिकाणीं आपल्या जीवाचें एकीकरण करून देहाचा त्याग केला ॥ ११ ॥ प्रथम त्या तत्त्वदर्शी मुनीनें, प्राण, मन आणि बुद्धि यांचें संयमन करून त्यांची बंधनें तोडिलीं आणि उत्तम सामधीचा स्वीकार केला. त्या वेळीं त्याचा देह पडला तें सुद्धां त्याला समजलें नाहीं ॥ १२ ॥ नंतर भगवंताच्या तेजानें युक्त झाल्यामुळें जो महाबलाढ्य झाला आहे, ज्याच्या सभोंवतीं सर्व देवगण जमले असून ज्याची मुनिगण स्तुति करीत आहेत, असा तो इंद्र, विश्वकर्म्यानें दधीचि ऋषीच्या अस्थींनीं निर्माण केलेलें वज्र धारण करून, त्रैलोक्याला हर्ष उत्पन्न करीत ऐरावतावर आरूढ झालेला शोभूं लागला ॥ १३ ॥ १४ ॥ राजा, ज्याप्रमाणें प्रलयकाळीं क्रुद्ध झालेला काळ यमाला मारण्याकरितां त्याच्या अंगावर धावून जातो, त्याप्रमाणें असुरसेनापतींनीं वेष्टिलेल्या वृत्रासुराचा वध करण्याकरितां तो इंद्र वेगानें त्या वृत्रासुराच्या अंगावर धावून गेला ॥ १५ ॥ नंतर वैवस्वत मन्वंतराच्या प्रारंभींच्या पहिल्याच महायुगांतील त्रेतायुगाच्या आरंभीं, नर्मदेच्या तीरीं देवांचा व असुरांचा अति भयंकर संग्राम झाला ॥ १६ ॥ त्यामध्यें, हे राजा, रुद्र, अष्टवसु, द्वादश आदित्य, अश्विनीकुमार, [illegible] पितर, अग्नि, मरुद्गण, ऋभुसंज्ञक व साध्यसंज्ञक देव आणि विश्वेदेव ह्यांच्या योगानें स्वत:च्या ऐश्वर्यानें शोभत असलेल्या वज्रधारी देवाधिपति इंद्राला युद्धामध्यें अवलोकन करून वृत्रासुरप्रभृति दैत्यांस त्याचा उत्कर्ष सहन झाला नाहीं ॥ १७ ॥ १८ ॥ ह्याकरितां नमुचि, शंबर, अनर्वा, ऋषभ, अंबर, हयग्रीव, शंकुशिरा, विप्रचित्ति, अयोमुख, पुलोमा, वृषपर्वा, प्रहेति, हेति व उत्कल इत्यादि दैत्य, दानव, यक्ष व हजारों राक्षस आणि सुमाली व माली हे ज्यांमध्यें प्रमुख आहेत आणि सुवर्णाचे अलंकार ज्यांनीं धारण केले आहेत असे वृत्रासुराकडील दुर्मद व निर्भय असे दैत्य, प्रत्यक्ष मृत्यूलाही दु:सह अशा इंद्रसैन्याच्या अग्रेसरांचें सिंहासारख्या गर्जनेनें निवारण करून, त्यांना पीडा देऊं लागले आणि गदा, परिघ, बाण, प्रास, मुद्गर, तोमर, शूल, परशु, खड्ग, शतघ्नी आणि भुशुंडी इत्यादि शस्त्रास्त्रांनीं ते असुर इंद्रावर चोहोंकडून वृष्टि करूं लागले ॥ १९ ॥ २० ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ हे राजा, एका बाणाच्या पिसाऱ्याला दुसऱ्या बाणाचा पिसारा लागून राहील अशा रीतीनें सोडिलेल्या बाणांच्या जाळ्यांनीं आसमंतात् आच्छादित झालेले ते देव, आकाशांतील मेघांनीं आच्छादित झालेल्या नक्षत्रांप्रमाणें दिसेनासे झाले ॥ २४ ॥ हे राजा, ते शस्त्रास्त्रवृष्टींचे ओघ शीघ्र वेध करणाऱ्या देवांनीं अंतरिक्षामध्येंच हजारों ठिकाणीं छेदून टाकिल्यामुळें देवसैनिकांना लागले नाहींत ॥ २५ ॥ नंतर सर्व शस्त्रास्त्रांचे समुदाय क्षीण झाल्यामुळें ते असुर पर्वतशिखरें, वृक्ष व पाषाण ह्यांच्या योगानें देवसैन्यावर वृष्टि करूं लागले; परंतु त्या गिरिशिखरादिकांचेंहि पूर्वीप्रमाणेंच देवांनीं तुकडे तुकडे केले ॥ २६ ॥ हे राजा, नंतर वृत्रासुर ज्यांचा नेता आहे असे ते असुर, आपल्या शस्त्रास्त्रसमुदायांनीं त्या इंद्राच्या सैनिकांना कांहीं क्षतसुद्धां न होतां ते सुखरूप आहेत, आणि वृक्ष, पाषाण व अनेक प्रकारचीं

पर्वतशिखरें ह्यांच्या योगानेंहि त्यांना कांहींज इजा झाली नाहीं, असें पाहून भयभीत झाले ॥ २७ ॥ सारांश, जशीं सत्पुरुषांच्या ठिकाणीं दुर्जनांनीं योजिलेलीं निंदापर कठोर भाषणें त्यांना क्षोभ उत्पन्न करीत नाहींत, त्याप्रमाणें कृष्णपरमात्मा अनुकूल असलेल्या त्या देवगणांच्या ठिकाणीं दैत्यांनीं पुनःपुनः त्यांच्या नाशाविषयीं केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ झाले ॥ २८ ॥ नंतर श्रीहरीचे भक्त नसल्यामुळें ज्यांचें धैर्य शत्रूंनीं हरण केलें आहे, व युद्धाविषयींचा ज्यांचा गर्व नष्ट झाला आहे अशा त्या जगद्विख्यात असुरानीं आपले प्रयत्न व्यर्थ झाले असें पाहून आपल्या अधिपतीचा युद्धभूमीच्या आघाडीवर त्याग करून पलायन करण्याचें मनांत आणिलें व त्याप्रमाणें पलायन करूं लागले ॥ २९ ॥ त्या वेळीं पलायन करीत असलेले आपले अनुयायी असुर व मोठ्या भयानें पळत सुटलेले व अस्ताव्यस्त झालेलें तें सैन्य अवलोकन करून तो पुरुषश्रेष्ठ महापराक्रमी धैर्यवान् वृत्रासुर हास्य करून धैर्यवान् लोकांना मनोहर वाटणारें असें समयोचित भाषण करूं लागला. तो म्हणाला,—हे विप्रचित्ते, हे नमुचे, हे पुलोमन्, हे मय, हे अनर्वन् आणि हे शंबर, तुम्ही माझें भाषण श्रवण करा ॥ ३० ॥ ३१ ॥ अहो शूर पुरुष हो, जो प्राणी उत्पन्न झाला आहे त्याला सर्व ठिकाणीं मृत्यु हा निःसंशय येणारच आहे. कारण, या संसारामध्यें मृत्यूच्या निवृत्तीचा उपाय ईश्वरानें निर्माण केलाच नाहीं. तेव्हां त्याच्यापासून अनायासानें जर इहलोकीं यश आणि परलोकीं स्वर्ग हे प्राप्त होत असतील तर अशा योग्य मृत्यूचा कोण बरें स्वीकार करणार नाहीं ? ॥ ३२ ॥ कारण, योगमार्गामध्यें प्रवृत्त होऊन व इंद्रियदमन करून ब्रह्मचिंतनानें देहाचा त्याग करणें आणि रणभूमीवर अग्रेसर होऊन माघारा न फिरतां देहत्याग करणें, असें हे दोन प्रकारचे मृत्यूच या लोकीं शास्त्रसंमत असून खरोखर दुर्लभ आहेत ॥ ३३ ॥

## दहावा अध्याय समाप्त

---

# अध्याय ११ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें तो दैत्याधिपति वृत्रासुर धर्माचा उपदेश करीत असतांहि ते असुर भयभीत झाल्यामुळें त्यांचें अंत:करण ठिकाणावर नाहींसें होऊन ते पळत सुटले व त्यांनीं त्या आपल्या प्रभूचें तें भाषण ऐकिलेंहि नाहीं ॥ १ ॥ तेव्हां हे राजा, कालानुसार वर्तन करणाऱ्या देवांनीं पळवून लाविलेली ती दैत्यांची सेना अनाथाप्रमाणें अस्ताव्यस्त झाली आहे असें पाहून, देवांचा पराक्रम सहन न करणारा तो इंद्रशत्रु असुरश्रेष्ठ वृत्रासुर अत्यंत क्रुद्ध झाला आणि बलात्कारानें त्या देवांचें निवारण करून त्यांची निर्भर्त्सना करूं लागला ॥ २ ॥ ३ ॥ तो म्हणाला,—‘अहो, मातेच्या उदरांतून विष्ठेप्रमाणें बाहेर निघालेल्या आणि संग्रामांतून पळत सुटलेल्या दैत्यांना पृष्ठभागीं धावून ताडण करणाऱ्या तुम्हांस काय बरें फळ प्राप्त होणार आहे? यश किंवा धर्म यांपैकीं कांहींच प्राप्त होणार नाहीं. कारण, स्वत:ला शूर मानणाऱ्या पुरुषांनीं भयभीत झालेल्या पुरुषांचा वध करणें हें या लोकीं स्तुत्य नाहीं व परलोकीं स्वर्गाची प्राप्ति करून देणारेंहि नाहीं ॥ ४ ॥ यास्तव, हे क्षुद्र देव हो, जर तुम्हांला संग्रामाची हौस असेल अथवा तमच्या हृदयामध्यें धैर्य असून क्षुद्र विषयसुखाची इच्छा नसेल, तर एक क्षणभर माझ्यासमोर उभे राहा ॥ ५ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें भाषण करून शरिराच्या योगानें आपले शत्रु जे देवगण त्यांना भयभीत करणाऱ्या त्या महाबलिष्ठ वृत्रासुरानें अशी मोठी गर्जना केली कीं, तिच्या योगानें सर्व प्राणी निश्चेष्ट झाले ॥ ६ ॥ आणि त्या वृत्रासुराच्या गर्जनेनें व त्याच्या दंड थोपटण्याच्या नादानें सर्व देव वज्रानें प्रहार केल्याप्रमाणें मूर्च्छित होऊन भूमीवर पडले ॥ ७ ॥ या वेळीं ज्याप्रमाणें एखादा मदोन्मत्त हत्ती देवनळांच्या बेटाचा चेंदामेंदा करितो त्याप्रमाणें रणभूमीवर मदोन्मत्त झालेला तो वृत्रासुर हातामध्यें शूळ घेऊन आपल्या सामर्थ्यानें पृथ्वीला थरथर कांपवीत, भयभीत होऊन डोळे मिटून पडलेल्या त्या देवसैन्याला पायांनीं तुडवूं लागला ॥ ८ ॥ तेव्हां देवसैन्याचें होत असलेलें तें मर्दन पाहून इंद्र क्रोधानें लाल झाला आणि समोर धावून येणाऱ्या त्या आपल्या शत्रूवर त्यानें हातांतील भव्य गदा फेंकिली. ती अत्यंत दु:सह गदा आपल्या अंगावर येत आहे असें जाणून वृत्रासुरानें ती डाव्या हातानें सहज धरिली ॥ ९ ॥ हे राजा, नंतर अत्यंत क्रुद्ध झालेल्या त्या महापराक्रमी इंद्रशत्रु वृत्रासुरानें, युद्धामध्यें गर्जना करीत करीत त्याच गदेनें इंद्राच्या ऐरावताच्या गंडस्थलावर प्रहार केला; तेव्हां त्या पराक्रमाबद्दल त्याची सर्वांनीं मोठी प्रशंसा केली ॥ १० ॥ ह्याप्रमाणें वृत्रासुराच्या गदेचा प्रहार झाला असतां, वज्राचा आघात झालेल्या पर्वताप्रमाणें ऐरावत मुखांतून रक्त ओकूं लागला आणि भ्रमिष्टाप्रमाणें अत्यंत पीडित होऊन इंद्रासह तत्क्षणीं सात धनुष्यांच्या अंतरावर मागें सरला ॥ ११ ॥ त्या वेळीं वाहन मूर्च्छित झाल्यामुळें इंद्र खिन्न झाला असतां त्याच्यावर त्या महात्म्या

वृत्रासुरानें पुनरपि गदेचा प्रहार केला नाहीं. थोड्या वेळांत अमृतस्रव होणाऱ्या आपल्या हस्ताच्या स्पर्शानें जखमी झालेल्या ऐरावताचें दुःख दूर करून इंद्र पुनः युद्धार्थ उभा राहिला ॥१२॥ हे परीक्षितराजा, याप्रमाणें वज्र धारण करून युद्धाच्या इच्छेनें इंद्र पुढें उभा राहिला असतां, आपला भाऊ जो विश्वरूप त्याला मारणाऱ्या त्या शत्रूला अवलोकन करून व त्याचें तें भ्रातृवधरूप क्रूर पापकर्म स्मरून, शोकानें संतप्त झालेला वृत्रासुर मोहानें व्याप्त होऊन हंसत हंसत त्याला म्हणाला ॥ १३ ॥

वृत्रासुर म्हणाला,—दुष्टा इंद्रा, तूं ब्रह्मघातकी, गुरुघातकी आणि भ्रातृघातकी आहेस. तूं माझा शत्रू असून माझ्यासमोर आतां उभा राहिला आहेस ही फार आनंदाची गोष्ट आहे. आज मी आपल्या शूळानें तुझें पाषाणासारखें हृदय विदारण करून तत्काळ आपल्या भ्रात्याच्या ऋणापासून मुक्त होईन, हीहि गोष्ट आनंदाचीच आहे ॥ १४ ॥ अरे, स्वर्गप्राप्तीची इच्छा करणारा निर्दय याज्ञिक जसा पशूचा शिरच्छेद करितो, त्याप्रमाणें तूं आत्मज्ञानी, ब्राह्मण, स्वतःचा गुरु, निष्पाप आणि यज्ञार्थ दीक्षा घेतलेल्या अशा माझ्या ज्येष्ठ बंधूचा विश्वास दाखवून शिरच्छेद केलास, ह्यामुळें लज्जा, संपत्ति, दया व कीर्ति ह्या तुझा त्याग करितील आणि पुरुषभक्षक राक्षसहि तुझी निंदा करितील. आतां माझ्या शूळानें लवकरच तुझा देह विदीर्ण होऊन दुःखानें तूं मरण पावशील, व तुझ्या शरीराला अग्नीचा स्पर्शहि न होतां तुला गृध्रपक्षी यथेष्ट भक्षण करितील ॥ १५ ॥ १६ ॥ हे दुष्टा, तुज घातक्याच्या अनुरोधानें वागणारे जे कोणी इतर अज्ञ देव, अस्त्र धारण करून मला प्रहार करितील, त्यांचे कंठ आपल्या तीक्ष्ण धारेच्या शूळानें तोडीन व त्यांच्या योगानें गणासह भैरवादि भूतनाथांचें पूजन करीन ॥ १७ ॥ अथवा हे वीरा इंद्रा, ह्या संग्रामामध्यें माझ्या सैन्याचा नाश करून कदाचित् तूंच जर माझें शिर वज्रानें तोडिलेंस तर मी कर्मबंधापासून मुक्त होऊन आपल्या देहाचा भूतांना बळि अर्पण करीन, व त्यायोगें धीर सत्पुरुषांच्या पदास प्राप्त होईन ॥ १८ ॥ हे सुरेश्वरा, मी तुझा शत्रु तुझ्यापुढें उभा असतां तूं आपलें अमोघ वज्र मजवर कां बरें टाकीत नाहींस? अरे, जशी कृपण पुरुषापाशीं केलेली कार्य करण्याविषयींची याचना व्यर्थ होत्ये, त्याप्रमाणें व्यर्थ झालेल्या पूर्वीच्या गदेप्रमाणें आतां वज्रहि निष्फळ होईल, असा तूं संशय मनामध्यें आणूं नकोस ॥ १९ ॥ हे इंद्रा, तुझें हें वज्र खरोखर श्रीहरीच्या तेजानें व दधीचि ऋषीच्या तपानें पाजळलेलें आहे. विष्णूनें तुला प्रेरणा केलेली आहे. यास्तव तूं त्याच वज्राच्या योगानें मज शत्रूचा वध कर. स्वतःच्या विजयाविषयीं तुला संदेह नको. कारण, जिकडे श्रीहरि असतो तिकडेच विजय, तिकडेच लक्ष्मी व तिकडेच दया इत्यादि सर्वहि गुण असतात ॥ २० ॥ आतां वधाच्या योगानें मला पीडा होईल हाहि संशय तूं आणूं नकोस. कारण, माझा स्वामी जो भगवान् संकर्षण त्यानें सांगितल्याप्रमाणें त्याच्या चरणकमळीं मी आपलें मन स्थिर करीन आणि तुझ्या वज्राच्या योगानें विषयभोगरूप पाश तुटला असतां देहाचा त्याग करून योगी पुरुषांना प्राप्त होणाऱ्या मोक्षरूप गतीला पावेन ॥ २१ ॥ आपल्यावर ज्यांची बुद्धि निश्चित झाली आहे अशा आपल्या भक्तांना

परमेश्वर स्वर्गातील, भूतलावरील आणि पाताळांतील संपत्ति खरोखरच देत नाहीं; कारण संपत्तीपासून वैर, उद्वेग, मनाचा संताप, गर्व, कलह, दुःख आणि श्रम हींच उत्पन्न होतात ॥ २२ ॥ हे इंद्रा, आमचा स्वामी संकर्षण आपल्या भक्ताला धर्मार्थकामसंबंधीं होत असलेले आयास दूर करितो. त्या आयासांच्या नाशावरूनच एकनिष्ठ भक्ताला प्राप्त होणारा व इतरांना दुर्लभ असा जो भगवत्प्रसाद त्याचें अनुमान करतां येतें. यास्तव ज्या अर्थी धर्मार्थकामसंबंधीं तुमचे प्रयत्न नाहींसे झाले नाहींत, त्या अर्थी भगवत्प्रसाद तुम्हांवर झालेला नाहीं; म्हणून स्वर्गादि संपत्तिहि तुम्हांलाच प्राप्त होतील ॥ २३ ॥ हे हरे, तुझे पायच ज्यांचा मुख्य आश्रय आहे, त्या दासांचा अनुदास होण्याची पुन्हा मी इच्छा करितों. माझें मन, तुज प्राणनाथाच्या गुणांचें स्मरण करो, माझी वाणीहि त्यांचेंच कीर्तन करो व माझा देहहि तुझी सेवा करो ॥ २४ ॥ हे सर्वसौभाग्यनिधे, मी स्वतःपासून तुला निराळा करून, ध्रुवपद, ब्रह्मपद, सार्वभौमपद, पातालाचें आधिपत्य, योगासिद्धि अथवा मोक्षहि इच्छीत नाहीं ॥ २५ ॥ हे कमलनयना, ज्याप्रमाणें पंख न फुटलेलें पक्ष्यांचें बालक, दिवाभीतादि पक्ष्यापासून त्रास पावलें असतां आपल्या मातेला पाहण्याची इच्छा करितें, किंवा दाव्यांनीं बांधलेलीं लहान लहान वासरें ज्याप्रमाणें आपल्या मातेच्या स्तनपानाची इच्छा करितात अथवा पतिवियोगामुळें खिन्न झालेली स्त्री, ज्याप्रमाणें दूर देशास गेलेल्या पतीला अवलोकन करण्याची इच्छा करित्ये, त्याप्रमाणें तापत्रयानें पीडिलेलें, कर्मांनीं बांधिलेलें आणि कामादिकांनीं खिन्न झालेलें माझें मन तुलाच अवलोकन करण्याची इच्छा करितें ॥ २६ ॥ हे नाथ, आपल्या कर्माच्या योगानें संसारचक्रामध्यें भ्रमण करीत असलेलें माझें मन तुज श्रेष्ठकीर्ति परमेश्वराच्या भक्तांच्याच ठिकाणीं सम होवो आणि तुझ्या मायेमुळें पुत्र, दारा आणि गृह ह्यांच्या ठिकाणीं पूर्वी आसक्त झालेलें माझें मन यापुढें संसारचक्रांत आसक्त न होवो ॥ २७ ॥

**अकरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १२ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, याप्रमाणें विजयापेक्षां मृत्यूच श्रेष्ठ असें मानणारा व युद्धामध्यें देहत्याग करण्याची इच्छा करणारा तो वृत्रासुर, जसा पूर्वी कैटभ-नामक दैत्य प्रलयोदकामध्यें श्रीविष्णूवर चाल करून गेला, त्याप्रमाणें शूळ घेऊन देवेंद्राच्या अंगावर धांवला ॥ १ ॥ नंतर त्या असुरश्रेष्ठ वृत्रासुरानें प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें कठोर ज्वालांनीं युक्त असा आपला शूळ गरगर फिरवून वेगानें महेंद्राला मारण्याकरितां फेंकला आणि गर्जना करून ‘ हे पापी इंद्रा, हा पाहा मेलास ! ’ असें तो वीर क्रोधानें म्हणाला ॥ २ ॥ त्या समयीं ग्रह व उल्का ह्यांप्रमाणें पाहण्यास अशक्य असा तो शूळ, भ्रमण करीत करीत आकाशांतून येत आहे असें पाहून, भयरहित अशा त्या वज्रधारी इंद्रानें, शंभर टोकांनीं युक्त असलेल्या वज्रानें त्या शूळाचें व वृत्रासुराच्या वासुकि सर्पासारख्या बाहूचें छेदन केलें ॥ ३ ॥ तेव्हां एक बाहु छिन्न झाला असतां खवळलेल्या त्या वृत्रासुरानें वज्र धारण करणाऱ्या इंद्राजवळ येऊन, आपल्या परिघानें इंद्राच्या हनुवटीवर आणि ऐरावताच्या अंगावर प्रहार केला. त्याबरोबर इंद्राच्या हातांतून वज्र खालीं पडलें ॥ ४ ॥ त्या वेळीं देव, असुर व सिद्ध-चारणांचे समुदाय त्या वृत्रासुराच्या महाद्भुत कर्माची प्रशंसा करूं लागले आणि इंद्राचें तें संकट पाहून हाहाःकारपूर्वक आक्रोश करूं लागले ॥ ५ ॥ नंतर शत्रुसमीप आपल्या हातांतून गळून पडलेलें वज्र, लज्जित झालेला इंद्र घेईनासा झाला. तेव्हां पुनरपि वृत्रासुर त्याला म्हणाला,—हे इंद्रा, खेद करण्याची ही वेळ नव्हे. आतां तूं वज्र धारण करून मी जो तुझा शत्रु त्या माझा वध कर ॥ ६ ॥ कारण उत्पत्ति, स्थिति व लय यांचा अधिपति जो सर्वज्ञ, अनादि, नित्य आणि अंतर्यामी परमात्मा त्यावांचून युद्धाची इच्छा धरून शस्त्र धारण करणाऱ्या व देहालाच सर्वस्व समजणाऱ्या लोकांना सदोदित जय कधींहि प्राप्त होत नाहीं. क्वचित् जय मिळतो तर क्वचित् मिळतहि नाहीं ॥ ७ ॥ जाळ्यानें बद्ध झालेले पक्षी जशी हालचाल करितात, त्याप्रमाणें लोकपालांसह हे लोक ज्याच्या आधीन राहून श्वासोच्छ्वासादि क्रिया करितात, तोच सर्वचालक भगवान् ह्या जयादिकांचें मुख्य कारण आहे ॥ ८ ॥ हे इंद्रा, इंद्रियशक्ति, मानसशक्ति, शरीरशक्ति, प्राण, जीवन व मृत्यु हीं ज्याचीं रूपें आहेत, असा तो भगवानच सर्वांना कारण आहे हें न जाणून लोक मोहानें जड देहच त्या सर्वांचें कारण आहे असें समजतात ॥ ९ ॥ हे इंद्रा, ज्याप्रमाणें लांकडाची बाहुली आणि यांत्रिक मृग हे पराधीन असतात तशींच सर्व भूतें ईश्वराधीन आहेत असें समज ॥ १० ॥ हे इंद्रा, पुरुष, प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार, पंचमहाभूतें, इंद्रियें व मन हीं ईश्वराच्या अनुग्रहावांचून ह्या विश्वाची उत्पत्ति वगैरे करण्यास समर्थ होत नाहींत ॥ ११ ॥ हे इंद्रा, वर सांगितल्याप्रमाणें ईश्वरच स्वतंत्र व सर्वनियंता आहे हें न जाणणारा पुरुष, पराधीन जीवालाच स्वतंत्र मानितो. स्वतः

ईश्वरच भूतांच्या योगें भूतें उत्पन्न करितो व त्यांच्याच योगानें त्यांचा संहार करितो ॥ १२॥ हे इंद्रा, पराजयकाळीं पुरुषाची इच्छा नसूनहि ज्याप्रमाणें कीर्ति, ऐश्वर्यहानि इत्यादि प्राप्त होतात, त्याप्रमाणें जयकाळीं आयुष्य, श्री, कीर्ति, ऐश्वर्य आणि इतरहि ज्या संपत्ति आहेत त्या सर्वहि पुरुषांना प्राप्त होतात ॥ १३ ॥ असो. ज्या अर्थी याप्रमाणें सर्व ईश्वराधीन आहे, त्याअर्थी पुरुषानें अपकीर्ति अथवा यश, जय अथवा पराजय, सुख अथवा दुःख आणि त्याचप्रमाणें मृत्यु अथवा जीवित ह्यांविषयीं हर्ष किंवा विषाद न मानितां समदृष्टीनें राहावें ॥ १४ ॥ हे इंद्रा, सत्त्व, रज आणि तम हे प्रकृतीचेच गुण असून आत्म्याचे नाहींत. यास्तव त्या गुणकार्यरूपी देहाच्या ठिकाणीं आपण साक्षिमात्र आहों असें जो जाणतो तो हर्षादिकांनीं लिप्त होत नाहीं ॥ १५ ॥ हे इंद्रा, माझें आयुध व भुज ह्यांचा छेद झाल्यामुळें जरी तूं माझा पराजय केलास, तथापि तुझे प्राण हरण करण्याच्या इच्छेनें मी युद्धामध्यें यथाशक्ति उद्योग करीतच आहें हें तूं पाहा ! ॥ १६ ॥ हें युद्ध म्हणजे द्यूत असून त्यामध्यें प्राण हीच पणाला लावण्याची वस्तु, बाण हेच फांसे आणि वाहनें ह्याच इकडेतिकडे फिरविण्याच्या सोंगट्या होत. तसेंच ह्या रणद्यूतामध्यें बाणरूप फांसा पडण्याचे पूर्वी अमक्याचा जय होईल अथवा अमक्याचा पराजय होईल हें समजत नाहीं ॥ १७ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षितराजा, वृत्रासुराचें हें निष्कपट भाषण श्रवण करून इंद्रानें त्याची प्रशंसा केली व हस्तामध्यें वज्र घेऊन विस्मयरहित असा तो हंसत हंसत त्याला उत्तर देऊं लागला ॥ १८ ॥

इंद्र म्हणाला--हे दानवा, तूं जन्मतः निकृष्ट असूनहि कृतार्थ झाला आहेस, हें मोठें आश्चर्य आहे. ज्या अर्थी अशा संकटसमयीं सुद्धां तुझी अशा प्रकारची बुद्धि आहे, त्या अर्थी तूं पूर्वी अनन्यभावानें अगदीं मनापासून जगन्मित्र जगदीश्वर परमात्म्याची सेवा केली आहेस असें वाटतें ॥ १९ ॥ त्याचप्रमाणें ज्या अर्थी आपल्या असुरस्वभावाचा त्याग करून तूं सत्पुरुषस्वभावाला पावला आहेस, त्या अर्थी तूं खरोखर जनमोहक अशी वैष्णवी माया तरून गेलेला आहेस ॥ २० ॥ अहाहा ! हे वृत्रासुरा, तूं स्वभावतः रजोगुणी असूनही सत्त्वमूर्ति अशा भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं तुझी बुद्धि दृढ झाली आहे, हें खरोखर मोठें आश्चर्य होय ॥ २१ ॥ आणि त्यामुळेंच स्वर्गादि सुखाची तुला अपेक्षा नाहीं, हें अगदीं योग्य आहे; कारण, मोक्षाधिपति भगवान् श्रीहरीच्या ठिकाणीं तुझी भक्ति दृढ झाली असतां त्या आनंदरूप अमृतसागरामध्यें क्रीडा करीत असणाऱ्या तुला, खाचेंतील उदकासारख्या क्षुद्र अशा स्वर्गसुखांचें काय महत्त्व वाटणार ? ॥ २२ ॥

शुकाचार्य म्हणाले,–हे परीक्षितराजा, याप्रमाणें धर्म जाणण्याच्या इच्छेनें परस्पर भाषण करणारे ते महापराक्रमी सेनापति इंद्र आणि वृत्रासुर एकमेकांबरोबर युद्ध करूं लागले ॥ २३ ॥ हे श्रेष्ठ राजा, शत्रुदमन करणाऱ्या वृत्रासुरानें आपला लोखंडाचा भयंकर परिघ डाव्या हातानें फिरवून इंद्रावर फेंकला ॥ २४ ॥ त्या वेळीं देवेंद्रानें तो वृत्रासुराचा परिघ व हत्तीच्या सोंडेसारखा त्याचा हात, हे दोन्ही एकदमच आपल्या

शंभर गांठींच्या वज्रानें तोडून टाकिले ।। २५ ।। तेव्हां हे राजा, इंद्रानें वज्राचा प्रहार केलेला तो वृत्र, समूळ छेदून टाकिलेल्या बाहूच्या मुळांपासून होणाऱ्या रक्तस्रावामुळें पंख तुटून आकाशांतून खालीं पडलेल्या पर्वताप्रमाणें शोभूं लागला ।। २६ ।। मग आपला अधरोष्ठ भूमीला लावून आणि वरचा ओंठ स्वर्गाला लावून वृत्रासुर आपल्या आकाशासारख्या गंभीर मुखानें, सर्पासारख्या भयंकर जिव्हेनें आणि मृत्यूसारख्या उग्र दंष्ट्रांनीं त्रैलोक्यच गिळून टाकीत आहे कीं काय असा दिसूं लागला. त्यानें अतिशय उंच असा मोठा देह धारण केला आणि वेगानें पर्वतांना स्थानापासून हालवीत व पायांनीं पृथ्वीचें चूर्ण करीत तो पादचारी पर्वतासारखा वृत्रासुर इंद्रासमीप आला व ऐरावतासह त्यानें त्याला गिळून टाकिलें ।। २७ ।। २८ ।। २९ ।।

हे राजा, महाबलाढ्य अजगर जसा हत्तीला गिळून टाकितो, त्याप्रमाणें वृत्रासुरानें त्या इंद्राला ग्रस्त केलेलें पाहून प्रजापति व महर्षि ह्यांसह सर्व देव उद्विग्न होऊन अरेरे ! असें म्हणून मोठा आक्रोश करूं लागले ।। ३० ।। असो. त्या दानवश्रेष्ठ वृत्रासुरानें जरी त्या इंद्राला गिळून टाकिलें, तथापि पोटांत गेलेला तो इंद्र, नारायणकवचानें, योगबलानें व मायेच्या बलानें युक्त असल्यामुळें तेथें मरण पावला नाहीं ।। ३१ ।। आपल्या वज्रानें वृत्राचें उदर फाडून तो समर्थ इंद्र बाहेर निघाला आणि पर्वतशिखरासारखें त्या शत्रूचें शिर त्यानें आपल्या बळानें छेदून टाकिलें ।। ३२ ।। हे राजा, वृत्राला मारण्याकरितां त्याची मान तोडीत तोडीत वाटोळें फिरत असलेल्या त्या अतिवेगवान् वज्रानें सूर्यादिकांच्या दक्षिणोत्तर गतींनीं होणारा संवत्सर पूर्ण होण्यास जितके दिवस लागतात, तितक्या म्हणजे ३६० दिवसांनंतर वृत्रासुराची हत्या होण्याचा योग्य काळ प्राप्त झाला असतां त्याचें मस्तक खालीं पडलें ।। ३३ ।। त्या वेळीं स्वर्गामध्यें दुंदुभि वाजूं लागल्या आणि महर्षि-गणांसह सिद्ध व गंधर्व ह्यांनीं इंद्रवीर्यप्रकाशक मंत्रांनीं त्याची स्तुति करीत करीत आनंदानें त्याच्यावर पुष्पवृष्टि केली ।। ३४ ।। हे शत्रुदमना राजा, त्या काळीं वृत्रासुराच्या देहांतून निघालेलें जें जीवनात्मक तेज, तें सर्व लोक पाहात असतांना लोकातीत अशा भगवत्स्वरूपास जाऊन मिळालें ।। ३५ ।।

**बारावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १३ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे उदार राजा, वृत्रासुराचा वध होतांक्षणींच एका इंद्रावांचून तिन्ही लोक लोकपालांसह संतापरहित होऊन मनांत आनंदित झाले ॥ १ ॥ नंतर देव, ऋषि, पितर, इतर प्राणी, देवांचें गंधर्वादि अनुयायी दैत्य आणि ब्रह्मदेव, महादेव व इतरहि लोकपाल अस्वस्थचित्त झालेल्या इंद्राला न विचारितां तसेच आपआपल्या स्थानीं निघून गेले ॥ २ ॥

राजा म्हणाला,—हे मुने, ज्या वृत्रासुराच्या वधानें सर्वहि देवांना सुख प्राप्त झालें असतां त्याच्याच योगानें इंद्राला दुःख काय म्हणून झालें ? तें इंद्राच्या दुःखाचें कारण श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. ॥ ३ ॥

श्रीशुकाचर्य म्हणाले,—हे राजा, वृत्रासुराच्या पराक्रमामुळें ऋषींसह उद्विग्न झालेल्या सर्व देवांनीं त्याचा वध करण्याकरितां इंद्राची प्रार्थना केली असतां ब्राह्मणवधापासून भयभीत झालेल्या त्या इंद्राला त्याचा वध करावा असें वाटलें नाहीं ॥४॥

इंद्र देवांना म्हणाला,—हे देव हो, स्त्रिया, भूमि, उदक आणि वृक्ष ह्यांनीं मजवर अनुग्रह करून विश्वरूपवधापासून उत्पन्न झालेलें माझें पातक वांटून घेतलें, म्हणून मी त्या पातकापासून कसातरी मुक्त झालों, पण आतां वृत्रहत्या कोणाला देऊन त्या पातकापासून मी मुक्त होऊं बरें ? ॥ ५ ॥

शुकाचर्य म्हणाले,—हे राजा, तें भाषण श्रवण करून, ऋषींनीं इंद्राला सांगितलें कीं, हे इंद्रा, आम्ही तुझ्याकडून, अश्वमेध करवून, श्रीहरीला संतुष्ट करूं म्हणजे तेणें करून तुझें कल्याण होईल, तूं भिऊं नकोस ॥ ६ ॥ अरे, ब्रह्महत्येच्या पातकाची तर गोष्ट कशाला पाहिजे ? परिपूर्ण, परमात्मा आणि समर्थ अशा देवाधिदेव नारायणाचें अश्वमेधाच्या योगानें पूजन केल्यास साऱ्या जगाच्या वधापासूनही तूं मुक्त होशील ॥ ७ ॥ अरे, ब्राह्मण, पिता, गाय, माता व गुरु ह्यांचा घात करणारा पातकी जन व त्याप्रमाणें श्वानभक्षक आणि चंडाळ हे सुद्धां ज्याच्या नामसंकीर्तनानें शुद्ध होतात त्या परमात्म्याचें आमच्या साहाय्यानें केलेल्या अश्वमेधयज्ञानें तूं श्रद्धापूर्वक पूजन करशील तर ब्रह्मदेवासह ह्या चराचर विश्वाचा वध जरी तूं केलास तथापि त्या पातकानेंहि तूं लिप्त होणार नाहींस; मग ह्या दुष्टाच्या वधानें तुला काय होणार आहे ? ॥ ८ ॥ ॥ ९ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें ब्राह्मणांनीं प्रेरणा केली असतां इंद्रानें शत्रूचा वध केला; परंतु त्याचा वध होतांक्षणींच मूर्तिमंत ब्रह्महत्या त्या इंद्राच्या मागें लागली ॥ १० ॥ तिच्यामुळें झालेला ताप इंद्रालाच सहन करावा लागला व त्याला

कशानेंहि सुख होईना. नांवलौकिकाची लाज बाळगणारा अब्रूदार पुरुष निंदेस प्राप्त झाला असतां त्याचे धैर्यादिक गुणहि त्याला सुख देत नाहींत ॥ ११ ॥ हे प्रजाधिपते परीक्षित्‌राजा, ती वृत्रहत्या, स्वरूपानें चांडाळस्त्रीसारखी असून तिच्या शरिराला वार्धक्यदशेमुळें कंप सुटला होता. ती क्षयरोगानें अगदीं व्याप्त झाली असून तिचें वस्त्र रक्तानें भरलें होतें. ती मस्तकावरील आपले शुभ्र केंस पिंजारून 'उभा रहा 'उभा रहा!' असें इंद्राला म्हणत होती व माशाची घाण येत असलेल्या आपल्या श्वासवायूच्या दुर्गंधानें मार्ग दूषित करीत ती चालली होती. ती आपल्या मागोमाग धांवत येत आहे असें पाहून इंद्र प्रथमतः आकाशामध्यें गेला; परंतु, तेथेंहि ती आहेच असें पाहून नंतर तो सर्व दिशा हिंडूं लागला. नंतर जिकडे जावें तिकडे ती आहेच, असें जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां, हे राजा, ईशान्य दिशेस जाऊन तो सत्वर मानससरोवरामध्यें प्रविष्ट झाला ॥ १२ ॥ १३ ॥ १४ ॥ त्या ठिकाणीं कमलाच्या तंतूंमध्यें कोणाच्या दृष्टीस न पडतां या ब्रह्महत्येपासून आपली सुटका कशी होईल, अशी चिंता करीत तो एक हजार वर्षेंपर्यंत तेथें राहिला. त्या वेळीं त्याला भोगप्राप्ति मुळींच झाली नाहीं. कारण, त्यानें जलामध्यें वास केला असल्यामुळें त्याला हविर्भाग नेऊन देणाऱ्या अग्निरूपी दूताचा तेथें प्रवेश होईना ॥ १५ ॥ असो. जोंपर्यंत त्या ठिकाणीं इंद्र गुप्तरूपानें राहिला होता, तोंपर्यंत विद्या, तप, विचार, सामर्थ्य आणि शरीरबळ ह्यांच्या योगानें, स्वर्गाचें पालन करण्यास समर्थ असलेल्या नहुषराजानें स्वर्गाचें राज्य केलें; परंतु संपत्ति व ऐश्वर्य ह्यांच्या योगानें उत्पन्न झालेल्या मदामुळें त्याची बुद्धि विवेकशून्य झाली. तेव्हां इंद्रपत्नी शची हिनें कांहीं उपाय करून त्याला सर्पयोनीस पोंचविलें ॥ १६ ॥ त्यानंतर ब्राह्मणांनीं हाक मारून इंद्राला बोलाविलें असतां तो इंद्र स्वर्गलोकास प्राप्त झाला. तो पूर्वींच सत्यपालक श्रीहरीच्या ध्यानानें निष्पाप झाला होता व ईशान्य दिसेस असणाऱ्या श्रीरुद्रदेवतेनें त्याचें तें ब्रह्महत्यारूप पातक निर्बळ केलें होतें; अर्थात् मानससरोवरांत लक्ष्मीनें रक्षण केलेल्या त्या इंद्राचा पराभव करण्यास तें समर्थ झालें नाहीं ॥ १७ ॥ हे भरतकुलोत्पन्ना राजा, नंतर ब्रह्मर्षींनीं त्याच्याजवळ येऊन ज्यामध्यें श्रीहरीचें आराधन आहे अशा अश्वमेधाची त्याला यथाविधि दीक्षा दिली ॥ १८ ॥ नंतर हे राजा, वेदवेत्त्या ऋषींनीं चालविलेल्या त्या अश्वमेधामध्यें इंद्रानें ज्याच्या शरिरामध्यें सर्व देव आहेत अशा सर्वांतर्यामी भगवंताचें पूजन केलें असतां, सूर्याच्या योगानें जसें धुकें नाहींसें होतें, तसा तो वृत्रासुरवधरूपी मोठा पापसंचय देखील त्या परमात्म्यानेंच खरोखर नाहींसा केला ॥ १९ ॥ २० ॥ याप्रमाणें तो इंद्र, मरीचिप्रभृति ऋषींनीं यथाविधि चालविलेल्या अश्वमेधाच्या योगानें यज्ञाधिपति पुराणपुरुषाचें पूजन करून निष्पाप झाला आणि पूर्वीप्रमाणें सर्वांना पूज्य झाला ॥ २१ ॥ असो. हें इंद्रवृत्राचें आख्यान सर्व पातकांचें क्षालन करणारें

असून त्यामध्यें पवित्राचरण, श्रीहरीचें कीर्तन, भक्तीची वृद्धि व भक्तजनांचें वर्णन आहे आणि ब्रह्महत्येपासून महेंद्राचा मोक्ष कसा झाला आणि विशेषेंकरून इंद्राला जय कसा मिळाला हेंहि सांगितलें आहे. धनदायक, यशस्कर, सर्वपापनिवर्तक, शत्रुनाशक, कल्याणकारक आणि आयुर्वर्धक असें हें आख्यान ज्ञानीजनांनीं सर्वदा पठण करावें किंवा प्रत्येक पर्वणीला तरी अवश्य श्रवण करावें ॥ २२ ॥ २३ ॥

## तेरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १४ वा

एवढा इतिहास ऐकून परीक्षत्‌राजानें शुकाला प्रश्न केला, —हे ब्रह्मनिष्ठा, रजोगुणी व तमोगुणी स्वभावाच्या त्या पापी वृत्रासुराची भगवान् नारायणाविषयीं दृढबुद्धि कशी झाली बरें ? ॥ १ ॥ कारण, शुद्ध व सत्त्वगुणी देवांना व शुद्ध चित्ताच्या ऋषींनाहि बहुतकरून भगवंताच्या पायांविषयीं भक्ति उत्पन्न होत नाहीं ॥ २ ॥ ह्या भूमंडळावर पृथ्वीच्या परमाणूंइतके असंख्यात प्राणी आहेत; परंतु त्यांपैकीं कांहीं जे मनुष्यादिक प्राणी आहेत त्यांना मात्र आपल्या कल्याणाची इच्छा उत्पन्न होते ॥ ३ ॥ पण त्यांमध्येंहि कांहीं श्रेष्ठ ब्राह्मणच मोक्षाची इच्छा करणारे असून त्या हजारों मुमुक्षूंमध्येंहि एखादाच कोणी सर्वसंगापासून मुक्त होऊन सिद्धि पावतो ॥ ४ ॥ हे महर्षे, मुक्त व तत्त्वज्ञानी अशा कोट्यवधि लोकांमध्येंहि ज्याचें अंतःकरण अत्यंत शांत आहे व नारायण हाच ज्याचा मुख्य आश्रय आहे, असा पुरुष अत्यंत दुर्लभ होय ॥ ५ ॥ असें असून सर्व लोकांना अत्यंत ताप देणारा असा तो पापी वृत्रासुर भयंकर युद्धामध्येंहि सदानंदरूप परमात्म्याच्या ठिकाणीं अशा प्रकारची दृढभक्ति धारण करणारा कसा झाला ? ॥ ६ ॥ तो इंद्राच्या भीतीनेंच सदानंदरूप परमात्म्याला शरण गेला म्हणावें तर तसेंहि म्हणतां येत नाहीं. कारण, त्यानें युद्धांतील पराक्रमानें इंद्रालाहि संतुष्ट केलें. यास्तव हे प्रभो, त्या वृत्रासुराच्या भक्तीविषयीं आम्हांला मोठा संशय आला असून खरा प्रकार श्रवण करण्याची उत्सुकता झाली आहे ॥ ७ ॥

सूत म्हणाला, ——हे शौनका, श्रद्धायुक्त अशा त्या परीक्षित्‌राजानें केलेला उत्तम प्रश्न ऐकून भगवान् व्यासपुत्र शुकाचार्य त्याची प्रशंसा करून उत्तर देऊं लागले ॥ ८ ॥

शुकाचार्य म्हणाले, ——हे राजा, नारदापासून, देवलापासून आणि व्यासमुखापासूनहि मी श्रवण केलेला हा इतिहास तूं आतां स्वस्थ अंतःकरणानें उत्तम प्रकारें ऐकून घे ॥ ९ ॥ हे राजा, शूरसेननामक देशामध्यें चित्रकेतु नांवानें प्रसिद्ध असा एक सार्वभौम राजा होता. त्याचे सर्व मनोरथ पृथ्वी पूर्ण करीत असे ॥ १० ॥ त्याला एक कोटी भार्या असून तो स्वतः पुत्रोत्पादनास समर्थ असतांहि दैवयोगानें त्या सर्व स्त्रिया वंध्या असल्यामुळें त्यांच्यापासून त्या राजाला संतति प्राप्त झाली नाहीं ॥ ११ ॥ यास्तव रूप, औदार्य, वय, जन्म, विद्या, ऐश्वर्य आणि संपत्ति इत्यादि सर्व गुणांनीं संपन्न असलेल्याहि त्या वंध्यापति चित्रकेतु राजाला मोठी चिंता उत्पन्न झाली ॥ १२ ॥ त्यामुळें सर्व संपत्ति, सुंदर स्वरूपाच्या राण्या आणि पाहिजे ते पदार्थ देणारी पृथ्वी ह्यांच्या योगानेंहि त्या सार्वभौम राजाला आनंद होईना ॥ १३ ॥ नंतर एके दिवशीं भगवान् अंगिराऋषि ह्या

त्रैलोक्यामध्यें पर्यटन करीत करीत सहजगत्या त्याच्या घरीं आला ॥ १४ ॥ त्या वेळीं चित्रकेतुराजानें त्याला सामोरें जाऊन विविध उपचारांनीं त्याचें यथाविधि पूजन केलें आणि भोजन करून तो अंगिरा आसनावर स्वस्थ बसला असतां, राजा विनयपूर्वक त्याच्या जवळ बसला ॥ १५ ॥ हे राजा, मग विनयानें नम्र होऊन आपल्याजवळ भूमीवर बसलेल्या त्या चित्रकेतुराजाचा त्या महर्षीनें सत्कार केला व त्याला गोड शब्दांनीं हांक मारून तो त्याच्याशीं बोलूं लागला ॥ १६ ॥

अंगिराऋषि म्हणाला;—हे राजा, जसा महत्तत्त्व, अहंकार इत्यादि सात प्रकृतींच्या योगानें जीव नित्य सुरक्षित असतो व तो त्यांच्यावांचून क्षणभरहि राहत नाहीं; तसाच राजासुद्धां गुरु, अमात्य, देश, किल्ले, द्रव्यसंचय, दंड आणि मित्र ह्या सात प्रकृतींनीं नित्य सुरक्षित असला म्हणजे राज्यसुखाचा अनुभव घेतो. ह्याकरितां तुझें स्वतःचें तसेंच त्या सर्व प्रकृतींचें आरोग्य व स्वस्तिक्षेम आहे ना ? ॥ १७ ॥ हे राजा, सात प्रधानांवर आपला सर्व भार टाकून जसा राजा त्यांच्या साहाय्यानें राज्यसुखाचा उपभोग घेतो तसेच प्रधानहि आपल्या सर्व अधिकारांचें मुख्य प्रभुत्व राजावर टाकून राजाच्याच आचारानें धनवान् होतात ॥ १८ ॥ तस्मात् भार्या, प्रजा, अमात्य, सेवक, व्यापारी लोक, मंत्री, नगरवासी लोक, मांडलिक राजे आणि पुत्र हे सर्व तुझ्या आज्ञेंत आहेत ना ? ॥ १९ ॥ त्याचप्रमाणें तुझें मनहि तुझ्या स्वाधीन आहे ना ? कारण ज्याचें मन स्वाधीन असेल त्याच्या आज्ञेमध्यें ते सर्व भार्यादि असतात व सर्व लोकहि आपल्या पालकांसह आळस न करितां त्याला करभार आणून देतात ॥ २० ॥ परंतु, हे राजा, तूं आपल्या मनानें संतुष्ट दिसत नाहींस ह्याचें कारण काय ? तुझें मुख अगदीं चिंताक्रांत झाल्यासारिखें दिसत आहे, ह्यावरून तुझा कांहीं तरी मनोरथ स्वतः तुझ्याकडून अथवा दुसऱ्याकडून पुर्ण झालेला नाहीं असें मला वाटतें ॥ २१ ॥ हे राजा, याप्रमाणें स्वतः सर्वज्ञ असूनहि त्या मुनीनें, चित्रकेतुराजाला नाना प्रकारचे प्रश्न केले असतां, विनयानें नम्र झालेल्या त्या पुत्रेच्छु राजानें, त्या मुनीला उत्तर दिलें ॥ २२ ॥

चित्रकेतु म्हणाला,—हे भगवन्, तप, ज्ञान व समाधि ह्यांच्या योगानें ज्याचें पातक नाहींसें झालें आहे, त्या तुम्हां योगिजनांना आम्हांसारख्या देहधारी प्राण्यांच्या बाहेर व मनांत जें कांहीं आहे तें सर्वहि ठाऊक आहे ॥ २३ ॥ तथापि हे ब्रह्मनिष्ठा, तूं जाणत असूनहि ज्या अर्थी मला प्रेरणा करून माझ्या मनामध्यें असलेली गोष्ट विचारीत आहेस, त्या अर्थी तुझ्या आज्ञेनेंच मी आतां तुला ती सांगतों ॥ २४ ॥ हे भगवन्, क्षुधा व तृषा ह्यांनीं व्याप्त होऊन अन्नोदकांची इच्छा करणाऱ्या पुरुषाला जसे इतर चंदनादिक पदार्थ सुख देत नाहींत, त्याप्रमाणें लोकपालांनींहि इच्छा करण्यास योग्य अशा ह्या सार्वभौम ऐश्वर्यासंबंधीं संपत्ति मज निपुत्रिकाला आनंद देत नाहींत ॥ २५ ॥ यास्तव हे महाभाग्यशाली मुने, निपुत्रिकपणापासून तूं माझें रक्षण कर आणि पूर्वजांसह आम्हांला प्राप्त होणाऱ्या दुस्तर नरकांतून पुत्रप्राप्तीच्या योगानें जेणेंकरून आम्ही तरून जाऊं असा कांहीं उपाय कर ॥ २६ ॥

शुकाचार्य म्हणाले, — हे परीक्षित्राजा, ह्याप्रयाणें चित्रकेतुराजानें त्या दयाळू भगवान् ब्रह्मपुत्राची प्रार्थना केली असतां त्या समर्थ ब्राह्मणानें राजाला पुत्रप्राप्ति होण्याकरितां त्वष्टानामक आदित्याला अर्पण करण्याच्या उद्देशानें चरु सिद्ध करून त्याच्या योगानें त्वष्टयाचें याजन केलें ॥ २७ ॥ हे भरतकुलोत्पन्ना राजा, त्या अंगिरानामक ब्राह्मणानें राजाच्या त्या कोटी राण्यांमध्यें वडील व गुणांनींहि श्रेष्ठ अशी जी कृतद्युति नांवाची राणी होती तिला यज्ञशेष राहिलेला चरु अर्पण केला व 'हे राजा, तुला हर्ष आणि शोक देणारा असा एक पुत्र होईल' असें सांगून तो ब्रह्मपुत्र निघून गेला ॥२८॥ ॥ २९ ॥ नंतर कृत्तिकादेवीनें ज्याप्रमाणें अग्नीपासून स्कंदरूप पुत्र धारण केला होता, त्याप्रमाणें त्या कृतद्युतीनेंहि तो हविःशेष भक्षण केल्यामुळें चित्रकेतूपासून तिला गर्भधारणा झाली ॥ ३० ॥ हे राजा, शूरसेन देशाचा अधिपति अशा चित्रकेतुराजाच्या वीर्यापासून झालेला तो तिचा गर्भ शुद्ध पक्षांतील चंद्राप्रमाणें दिवसानुदिवस हळूहळू वाढूं लागला ॥ ३१ ॥ पुढें योग्य काळ प्राप्त झाला असतां कृतद्युतीला पुत्र झाला व ती वार्ता ऐकून त्या देशांतील सर्व लोकांना अत्यंत आनंद प्राप्त झाला ॥ ३२ ॥ इकडे तें वर्तमान ऐकतांक्षणींच आनंदित झालेल्या त्या राजानें स्नान करून व शुचिर्भूत होऊन अलंकार धारण केले आणि ब्राह्मणांकडून पुण्याहवाचनद्वारा आशीर्वाद ग्रहण करून पुत्राचें जातकर्म करविलें ॥ ३३ ॥ त्या वेळीं उदारचित्त अशा त्या चित्रकेतुराजानें त्या ब्राह्मणांना सुवर्ण, रौप्य, वस्त्रें, भूषणें, गांव, अश्व, गज आणि साठ कोटि गाई अर्पण करून, ह्या वेळेस लोकांचे मनोरथ पूर्ण केले असतां आपल्या पुत्राला यश व संपत्ति प्राप्त होऊन त्याच्या आयुष्याचीहि वृद्धि होईल. अशा अभिप्रायानें त्या राजानें इतर प्राण्यांचेहि मनोरथ—पर्जन्य जसा वृष्टि करून लोकांचे मनोरथ पूर्ण करितो त्याप्रमाणें—पूर्ण केले ॥ ३४ ॥ ॥ ३५ ॥ नंतर जसें निर्धन मनुष्यास संकटानें धन प्राप्त झालें असतां त्याविषयीं त्याची प्रीति वाढत जात्ये, त्याप्रमाणें मोठ्या संकटानें प्राप्त झालेल्या पुत्राविषयीं त्या राजर्षि पित्याचें प्रेम दिवसानुदिवस सारखें वाढूं लागलें ॥ ३६ ॥ त्याप्रमाणें कृतद्युतिमातेचेंहि त्या पुत्रावर अत्यंत मोहकारक असें प्रेम वाढूं लागलें; पण तिच्या सर्व सवतींना मात्र संतति नसल्यामुळें दुःख वाटूं लागलें ॥ ३७ ॥ इकडे प्रति दिवशीं बालकाचें लालन करीत असल्यामुळें चित्रकेतुराजाची आपल्या पुत्रवति राणीवर जशी प्रीति जडली तशी इतरांवर राहिली नाहीं ॥ ३८ ॥ म्हणून त्या सर्व सवती पोटीं संतान नसल्यामुळें होणारें दुःख व त्यामुळेंच राजाकडून होत असलेला अनादर ह्याच्या योगानें अतिशय संतप्त होऊन पुत्रयुक्त असलेल्या सवतीविषयीं मत्सर धरून आपलीच निंदा करूं लागल्या ॥ ३९ ॥ त्या म्हणाल्या, अरेरे ! चांगल्या संततीनें युक्त असलेल्या सवती जिचा दासीप्रमाणें तिरस्कार करितात व पतिहि गृहामध्यें जिला बहुमान देत नाहीं, त्या पापिणी निपुत्रिक स्त्रीला धिक्कार असो ! ॥ ४० ॥ अहो, स्वामिसेवेमुळें ज्यांना वारंवार सन्मान मिळतो अशा दासींना तरी खरोखर काय खरें दुःख आहे ? कारण त्यांच्या हातून सेवा घडत असल्यामुळें त्यांना मान तरी मिळत असतो आणि आम्ही तर वंध्या असल्यामुळें केवळ

अनादरालाच पात्र आहेत आणि दासींच्याहि दासींप्रमाणें खरोखर भाग्यहीन आहोत ॥ ४१ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें सवतीच्या पुत्रसंपत्तीमुळें दुःखित झालेल्या व राजाच्या मनाविरुद्ध वर्तन करणाऱ्या त्या सर्व स्त्रियांना कृतद्युतीविषयीं द्वेष उत्पन्न झाला ॥ ४२ ॥ द्वेषामुळें त्या स्त्रियांची बुद्धि अगदीं नष्ट होऊन त्यांचें मन फार क्रूर झालें व राजा पुत्रावर प्रेम करीत असे तें त्यांना सहन न झाल्यामुळें त्यांनीं त्या पुत्राला विष घातलें ॥ ४३ ॥ सवतींचें घातुक कृत्य कृतद्युतीला माहीत नसल्यामुळें आपला बालक निजलेलाच आहे असें समजून ती घरांत फिरत होती ॥ ४४ ॥ परंतु पुढें आपला बालक फार वेळ निजला आहे असें जाणून त्या चतुर राणीनें, ' मुलाला घेऊन ये, ' असें दाईला सांगितलें ॥४५॥ तेव्हां ती दासी निजलेल्या मुलाजवळ गेली; पण त्याच्या नेत्रांतील बुबळें बाहेर आलीं आहेत व प्राण, इंद्रियें आणि आत्मा हीं त्याला सोडून गेलीं आहेत असें पाहून, ' अरेरे ! माझा सर्वस्वीं घात झाला ! ' असा मोठ्यानें आक्रोश करून ती भूमीवर पडली ॥ ४६ ॥ नंतर हातांनीं वक्षःस्थळ बडवून घेणाऱ्या त्या दासीचें तें अत्यंत आक्रोशयुक्त मोठ्यानें रडणें ऐकून राणी मोठ्या त्वरेनें पुत्राजवळ आली आणि पहात्ये तों आपला अल्पवयी पुत्र एकाएकीं मरण पावला असें तिच्या दृष्टीस पडलें ॥ ४७ ॥ त्या वेळीं अतिशय वाढलेल्या शोकामुळें ती अगदी मूर्च्छित होऊन भूमीवर पडली व तिचे केंस व वस्त्र हीं अगदीं अस्ताव्यस्त होऊन गेलीं ॥ ४८ ॥ नंतर राजाच्या अंतःपुरांतील पुरुष व स्त्रिया अशी सर्व मंडळी, तें राणीचें रडणें ऐकून तेथें आली व समदुःखी होऊन तीही रडूं लागली; तेव्हां अपराध करणाऱ्या त्या सवतीहि तेथें आल्या व मोठ्या दुःखाचें सोंग आणून रडूं लागल्या ॥ ४९ ॥ कांहींएक कारण नसतां पुत्र मरण पावला हें वर्तमान थोड्या वेळानें राजाच्या कानीं गेलें. तें ऐकून त्याच्या डोळ्यांवर अंधेरी आली व स्नेहामुळें त्याचा शोक भडकला व मार्गामध्यें वारंवार ठेंचाळत, पडत व मूर्च्छित होत तो चित्रकेतुराजा, मरण पावलेल्या त्या बालकाजवळ येऊन पडला. त्याच्या मागून त्याचे प्रधानहि धांवत आले व ब्राह्मणांचाहि घोळका भोंवतीं जमला. राजाचे केंस व वस्त्रें हीं अगदीं अस्ताव्यस्त होऊन गेलीं होतीं. तो दीर्घश्वास टाकूं लागला व त्याचे नेत्र अश्रुबिंदूंनीं भरून कंठ दाटून आल्यामुळें त्याच्यानें शब्दहि बोलवेना ॥ ५० ॥ ॥ ५१ ॥ त्या वेळीं कृतद्युतिराणी अतिशोकानें व्याप्त झालेल्या त्या आपल्या पतीला आणि एकुलत्या एक अशा त्या मरण पावलेल्या बाल पुत्राला पाहून विलाप करूं लागली. तो विलाप पाहून अंतःपुरवासी जन आणि अमात्यादि प्रधानमंडळ ह्यांचेंहि हृदय दुःखानें भरून गेलें ॥ ५२ ॥ मग केशर व चंदन ह्यांनीं भूषित असलेल्या आपल्या दोन्ही स्तनांवर कज्जलयुक्त बाष्पबिंदूंनीं सिंचन करणारी ती कृतद्युति, ज्यांच्यापासून पुष्पें गळून पडत आहेत असे आपले केंस अस्ताव्यस्त करून सुस्वर आणि विचित्र असे टिटवी पक्षिणीप्रमाणें पुत्राचे गुण आठवून शोक करूं लागली ॥ ५३ ॥ ती म्हणाली,—हे विधात्या, वडील माणसें जिवंत असतांना बालकाला मरण प्राप्त होतें, ह्यावरून तूं आपल्या सृष्टीच्या विरुद्ध वागत आहेस असें दिसतें. यास्तव तूं अतिशयच मूर्ख आहेस ! हे ब्रह्मदेवा, जन्ममृत्यूंना जर विपरीत क्रम

असेल तर तूं प्राण्यांना अति दुःख देणारा असा त्यांचा नित्य शत्रूच आहेस असें म्हणावें लागेल ॥५४॥ हे विधात्या, पुत्र जिवंत असतांनाच पिता मरण पावावयाचा व पिता जिवंत असतांनाच पुत्र उत्पन्न व्हावयाचा, असा जर जन्ममरणाविषयीं नियम नसेल, तर ते जन्मादिक प्राण्यांच्या स्वकर्मांनींच त्यांना प्राप्त व्हावेत, मग येथें तुझें काय प्रयोजन ? आपल्या सृष्टीच्या वृद्धीकरितां तूं जो स्नेहपाश उत्पन्न केला आहेस तो या तुझ्या वृत्तीनें तूं स्वतःच छेदून टाकीत आहेस ! तेव्हां अशा प्रकारचें तुझें दुःखकारक कर्म पाहून कोणीहि पुत्रादिकांवर प्रेम करणार नाहीं ॥५५॥ असें म्हणून ती मुलाकडे पाहून रडूं लागली. ती म्हणाली, ' बाळा, मज दीन अनाथेचा त्याग करणें तुला योग्य नाहीं. अरे, तुझ्या शोकामुळें संतप्त झालेल्या आपल्या पित्याकडे तरी तूं पाहा; अरे बाळा, निपुत्रिक लोकांना दुस्तर असें जें घोर नरकदुःख, तें आम्हीं तुझ्या योगानें अनायासानें तरून जाऊं. तूं त्या निर्दय यमासह दूर जाऊं नकोस ॥ ५६ ॥ अरे बाळा, आतां ऊठ, तुला निजून पुष्कळ वेळ झाला. हे राजपुत्रा, तुझे हे खेळगडी लहान बालक, तुला खेळण्याकरितां बोलावीत आहेत. ऊठ ! ऊठ लवकर ! तुला फार भूक लागली असेल. भोजन कर व स्तनपान कर आणि हे बाळा, आम्हां स्वजनांचे दुःख हरण कर ॥ ५७॥ हे पुत्रा, पूर्वीं मी तुझ्याजवळ आल्यें असूनहि हतभाग्य असल्यामुळें तुझें मनोहर हास्य आणि सानंददृष्टि ह्यांनीं युक्त असलेलें मुखकमळ अवलोकन केलें नाहीं व आतांहि तुझ्या बोबड्या मधुर वाणी मला ऐकूं येत नाहींत. तरी त्या निर्दय यमानें तुला नेल्यामुळें पुनरपि कधींच परत न येण्याच्या बेतानें तूं परलोकास गेलास कीं काय ? ॥ ५८ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें नाना प्रकारें बोलून ती राणी मृतपुत्राविषयीं शोक करीत असतां, चित्रकेतुराजा अत्यंत दुःखित होऊन, गळा काढून मोठ्यानें रडूं लागला ॥५९॥ ह्याप्रमाणें तीं उभयतां स्त्रीपुरुषें विलाप करूं लागलीं, तेव्हां त्यांचे अनुयायी, अमात्य वगैरे सर्व पुरुष आणि स्त्रिया हींसुद्धां रडूं लागलीं. असें होतां होतां सर्व नगरच निश्चेष्ट झालें ॥६०॥ ह्याप्रमाणें सर्व लोक मोहित होऊन निश्चेष्ट झाले आहेत व त्यांना बोध करणाराहि कोणी नाहीं, असें जाणून अंगिरानामक मुनि नारदासह त्या ठिकाणीं प्राप्त झाला ॥६१॥

## चौदावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १५ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, त्या वेळीं शोकानें व्याप्त होऊन आपल्य पुत्राच्या शवाजवळ प्रेताप्रमाणें पडलेल्या त्या चित्रकेतुराजाला चांगल्या शब्दांनीं बोध करण्याकरितां नारद व अंगिराऋषि त्याच्याशीं बोलूं लागले ॥ १ ॥ ते म्हणाले,—हे राजेंद्रा, ज्याच्याकरितां तूं शोक करीत आहेस तो, ह्या प्रजासृष्टीमध्यें भूत, वर्तमान व भविष्य जन्मांमध्यें तुझा कोण होता बरें ? व तूं तरी ह्यांच्या आप्तसंबंधांपैकीं कोण होतास ? ॥ २ ॥ जसे नदीच्या प्रवाहाच्या वेगानें वाळूचे कण एकत्र होतात किंवा वियोग पावतात त्याचप्रमाणें जीवहि कालवेगानें संयुक्त व विमुक्त होतात ॥ ३ ॥ हे राजा, ज्याप्रमाणें कांहीं बीजांपासून बीजें उत्पन्न होतात आणि कांहींपासून होत नाहींत अथवा झालीं असतांहि नाश पावतात, त्याचप्रमाणें ईश्वराच्या मायेनें प्रेरित झालेले पुत्रादि प्राणी पित्रादि प्राण्यांपासून उत्पन्न होतात आणि नाश पावतात ॥ ४ ॥ हे राजा, सांप्रतकाळीं अस्तित्वांत असणारे आम्ही, तूं व हे इतर चराचर प्राणी, जसे जन्माच्या पूर्वी नव्हते तसेंच ते मरणानंतरहि असणार नाहींत. त्याप्रमाणेंच सध्यांहि ते नाहींतच असें समजलें पाहिजे ॥ ५ ॥ हे राजा, भूताधिपति व जन्मादिविकारशून्य असा ईश्वर स्वतः उत्पन्न केलेल्या व परतंत्र अशा भूतांच्याच योगानें भूतांची उत्पत्ति, स्थिति व लय करितो. ईश्वराला वस्तुतः कसलीच अपेक्षा नसते. तथापि ही सृष्ट्यादि लीला तो खेळणाऱ्या मुलाप्रमाणें करीत असतो ॥ ६ ॥ हे राजा, ज्याप्रमाणें बीजापासून बीज उत्पन्न होतें त्याचप्रमाणें पित्याच्या देहाच्या वेशानें मातेच्या देहापासून पुत्राचा देह उत्पन्न होतो. त्यांत पृथ्वी आदिकरून भूतें जशीं निर्विकार आहेत, त्याप्रमाणें देहधारी जीवात्मा देहसंबंधीं जन्मादि विकारांपासून अलिप्त असून सर्वकाळ एकरूपच आहे ॥ ७ ॥ हे राजा, जसा घट—पट इत्यादि जाती व त्यांतील घागर, परळ, धोतरजोडा, पीतांबर इत्यादि विशिष्ट पदार्थ यांचा निरनिराळेपणा त्यांच्या मूळ कारणाच्या दृष्टीनें केवळ कल्पित आहे, त्याप्रमाणें देह व जीव ह्यांचा परस्पर संबंध अनादि कालापासून अज्ञानामुळेंच कल्पिलेला आहे ॥ ८ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें नारद व अंगिराऋषि यांनीं केलेल्या भाषणामुळें चित्रकेतुराजाला धीर आला आणि दुःखानें म्लान झालेलें आपलें मुख हातानें पुसून तो त्या ऋषींना बोलूं लागला ॥ ९ ॥

तो म्हणाला,—अवधूत वेष धारण करून गुप्तरीतीनें संचार करणारे, पूज्यलोकांमध्येंहि अतिपूज्य आणि ज्ञानसंपन्न असे येथें आलेले तुम्ही दोघे जण कोण आहां बरें ? ॥ १० ॥ कारण, उन्मत्तासारखा वेष धारण करणारे भगवद्भक्त ब्राह्मण, विषयांवर आसक्त असणाऱ्या माझ्यासारख्या लोकांना बोध करण्याकरितां पृथ्वीवर यथेष्ट संचार करीत असतात ॥ ११ ॥ हे ब्रह्मनिष्ठ हो, सनत्कुमार, नारद, ऋभु, अंगिरा, देवल, असित, अपांतरतम, व्यास, मार्कण्डेय, गौतम, वशिष्ठ, भगवान् परशुराम, कपिल, शुकाचार्य, दुर्वास, याज्ञवल्क्य,

जातुकर्ण्य, उद्दालक, रोमश, च्यवन, दत्त, पतंजली, आसुरी, वेदशिरा, बोध्य, पंचशिरा, हिरण्यनाभ, कौशल्य, श्रुतदेव आणि ऋतध्वज हे व दुसरेहि सिद्धांमध्यें श्रेष्ठ असे ऋषि-लोक ज्ञानाचा उपदेश करण्याकरितां पृथ्वीवर संचार करीत असतात ॥ १२ ॥ १३ ॥ ॥ १४ ॥ १५ ॥ यास्तव पशूंप्रमाणें ग्राम्य विषयावर लंपट असल्यामुळें मूढबुद्धि झालेल्या व महामोहरूपी अंधकारामध्यें मग्न झालेला असा जो मी, त्या माझा तुम्ही उद्धार करण्याला समर्थ आहां; तरी तुम्ही मला ज्ञानरूप दिवा दाखवा ॥ १६ ॥

अंगिराऋषि म्हणाला,–हे राजा, तुज पुत्रेच्छूला पुत्र देणारा जो अंगिराऋषि तोच मी आहें व हा साक्षात् ब्रह्मपुत्र भगवान् नारद आहे ॥ १७ ॥ हे राजा, पुत्रशोका-मुळें तूं दुस्तर दुःखामध्यें निमग्न झाला आहेस; परंतु तूं भगवद्भक्त असल्यामुळें असें दुःख भोगण्यास योग्य नाहींस. तुजवर अनुग्रह करण्याकरितां आम्ही येथें प्राप्त झालों आहों. कारण, ब्राह्मणवत्सल असा भगवद्भक्त खिन्न होण्यास योग्य नाहीं ॥ १८ ॥ १९ ॥ हे राजा, जेव्हां मीं पूर्वी तुझ्या घरीं आलों होतों तेव्हांच तुला उत्तम ज्ञानाचा उपदेश करणार होतों; परंतु तुला पुत्रप्राप्तीची फार इच्छा आहे असें पाहून मीं तुला त्या वेळीं पुत्रच दिला ॥ २० ॥ आतां पुत्रवान् लोकांना काय दुःख होतें ह्याचा तुला अनुभव येतच आहे. पुत्रच केवळ दुःखाला कारण आहे असें नाहीं; तर हे राजा, स्त्री, गृह, द्रव्य, अनेक प्रकारचें ऐश्वर्य व संपत्ति तसेंच शब्दादि विषय, राज्यसंबंधीं ऐश्वर्यें, भूमि, राज्य, सैन्य, जामदार-खाना, सेवक, अमात्य व मित्र हे सर्वहि शोक, मोह, भय आणि पीडा देणारे असून अनित्य आहेत. ते गंधर्वनगराप्रमाणें क्षणभर भासमान होऊन लय पावत असल्यामुळें, स्वप्न, माया व मनोरथ ह्यांप्रमाणें मिथ्या आहेत ॥ २१–२३ ॥

हे राजा, कर्मवासनांच्या योगानें अहर्निश विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाच्या मनापासून कर्में उत्पन्न झालीं आहेत. यास्तव पापपुण्यरूप कर्मेंच जर मनापासून उत्पन्न होतें, तर त्या कर्मांच्या योगानें साध्य होणारे अर्थहि मनःकल्पितच होत ॥ २४ ॥ हे राजा, पंचमहाभूतरूप द्रव्यें, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें ह्यांच्या समुदायानें बनलेला हा देहच, देहा-भिमानी जीवाला नाना प्रकारचे क्लेश व संताप उत्पन्न करितो असें सांगितलें आहे ॥ २५ ॥ यास्तव एकाग्र मनानें तूं आत्मतत्त्वाचा विचार कर आणि हे विषय नित्य आहेत अशा प्रकारचा जो द्वैतरूपी प्रपंचसंबंधीं विश्वास तो टाकून देऊन शांतीचा आश्रय कर ॥ २६ ॥

नारद म्हणाले,—हे राजा, तूं इंद्रियनिग्रह करून ह्या मंत्ररूप उपनिषदाचा मजपासून स्वीकार कर. हा मंत्रोपनिषद् जपरूपानें धारण करीत असतां सात रात्रींमध्येंच तुला संकर्षणप्रभूचें दर्शन होईल ॥ २७ ॥ आणि तूं त्या संकर्षणप्रभूच्या चरणांजवळ प्राप्त होशील आणि पूर्वी ज्याप्रमाणें रुद्रादि देव ह्या द्वैतरूपी भ्रमाचा त्याग करून, ज्याशीं समान किंवा अधिक कांहीं नाहीं अशा ज्या सर्वोत्कृष्ट महत्त्वाला जाऊन पोंचले त्या महत्पदाला तूंहि तत्काल जाऊन पावशील ॥ २८ ॥

॥ पंधरावा अध्याय समाप्त ॥

---

# अध्याय १६ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षत्राजा, नंतर देवर्षि नारदानें मरण पावलेल्या त्या राजपुत्राला योगसामर्थ्यानें उठविलें आणि शोक करीत असलेल्या त्याच्या ज्ञातिबांधवांना त्याला दाखवून तो त्याच्याशीं बोलूं लागला ॥ १ ॥

नारद म्हणाला,—हे जीवात्म्या, तुझें कल्याण असो. तुझ्यामुळें उत्पन्न झालेल्या शोकानें अत्यंत तप्त झालेल्या ह्या इष्टमित्रांना, बांधवांना व मातापितरांना अवलोकन कर ॥ २ ॥ अरे, अपमृत्यूनें मृत झाल्यामुळें तुझें आयुष्य अवशिष्ट राहिलें आहे. ह्याकरितां आपल्या देहामध्यें प्रवेश करून पित्यानें दिलेल्या भोगांचा तूं मित्रवर्गासह उपभोग घे व राज्यासनावर आरूढ हो ! ॥ ३ ॥

जीव म्हणाला,—हे नारदा, कर्माच्या योगानें देव, पशु, पक्षी व मनुष्य या योनींमध्यें मी भ्रमण करीत असतां हे लोक माझे कोणत्या जन्मामध्यें मातापितर झाले बरें ? ॥ ४ ॥ आतां मी मरण पावल्यामुळें पुत्रबुद्धीनें जर हे मजकरितां शोक करीत असतील, तर शत्रुबुद्धीनें माझ्या मरणाबद्दल ह्यांना हर्ष तरी कां होऊं नये ? कारण, सर्वच प्राणी क्रमाक्रमानें सर्वांचे परस्पर बंधु, सपिंड, शत्रु, मध्यस्थ, मित्र, उदासीन आणि द्वेषी होत असतात ॥ ५ ॥ अहो, ज्याप्रमाणें क्रयविक्रयास योग्य अशा सुवर्णादि वस्तु व्यवहार करणाऱ्या पुरुषांमध्यें इकडेतिकडे हिंडत असतात, त्याचप्रमाणें जीवहि आईबापांच्या ठिकाणीं हिंडत असतो ॥ ६ ॥ सुवर्णादि नित्य वस्तूंचा संबंधहि पुरुषांच्या ठिकाणीं अनित्यच दृष्टीस पडतो. कारण, जोंपर्यंत ज्या वस्तूचा ज्या पुरुषाशीं संबंध असतो, तोंपर्यंत त्या वस्तूच्या ठिकाणीं त्या पुरुषाचें ममत्व असतें; पण तीच वस्तु विकणें किंवा बक्षीस देणें वगैरे कारणांनीं दुसऱ्याकडे गेली, म्हणजे तिच्यावरील त्याचें ममत्व नाहींसें होतें ॥ ७ ॥ ह्याचप्रमाणें पित्रादिसंबंधाला प्राप्त झालेला नित्य व वस्तुत: अहंकाररहित असा तो जीव, ज्या पित्रादिकांच्या ठिकाणीं जोंपर्यंत विद्यमान असतो. तोंपर्यंतच त्याचें पित्रादिकांविषयीं स्वत्व असतें ॥ ८ ॥ जीव हा नित्य आहे. कारण, हा अविनाशी व जन्मादिरहित आहे. तो स्वयंप्रकाश असल्यामुळें जन्मादिकांनीं युक्त असलेल्या देहादिकांचा आश्रय आहे. हा समर्थ असल्यामुळें आपल्या मायेच्या गुणांनीं आपणांसच विश्वरूपानें उत्पन्न करितो ॥ ९ ॥ ह्या जिवाला अतिप्रिय, अथवा अप्रिय, किंवा स्वकीय अथवा परकीय असें कोणीच नाहीं. कारण, हित आणि अहित करणाऱ्या पित्रादिकांच्या सर्व विचित्र बुद्धींचा हा साक्षी असल्यामुळें तो स्वत: असंग आहे ॥ १० ॥ हा जीवात्मा स्वतंत्र, कारण व कार्य ह्यांचा साक्षी आणि सर्वत्र तटस्थ असल्यामुळें, सुखदु:ख व राज्यादिक कर्मफळ ह्यांचा तो स्वीकारच करीत नाहीं ॥ ११ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्राजा, ह्याप्रमाणें भाषण करून जेव्हां तो जीव निघून गेला, तेव्हां त्या बालकाचे ते चित्रकेतुप्रभृति ज्ञातिबांधव विस्मित होऊन त्यांनीं आपली स्नेहरूप शृंखला तोडून टाकून शोकाचा त्याग केला ॥ १२ ॥ नंतर सपिंडांनीं त्या बालकाचा देह दग्ध करून त्याच्या योग्य अशा श्राद्धतर्पणादि क्रिया केल्या आणि शोक, मोह, भय आणि दैन्य उत्पन्न करणारा व त्याग करण्याविषयीं अशक्य असा जो स्नेह तो त्यांनीं टाकून दिला ॥ १३ ॥ हे राजा, त्या वेळीं बालहत्येमुळें निस्तेज होऊन लज्जित झालेल्या व 'पुत्रादिक हेच सर्व दुःखाला कारण आहेत' अशा ह्या अंगिराऋषीच्या भाषणाचें स्मरण करून देणाऱ्या त्या बालघातकी राजस्त्रियांनीं पुत्रकामनाशून्य व निर्मत्सर होऊन, बालहत्येच्या निवारणासाठीं ब्राह्मणांनीं सांगितल्याप्रमाणें यमुनेच्या तीरीं प्रायश्चित्त केलें ॥ १४ ॥ असो. ह्याप्रमाणें अंगिराऋषि व नारद ह्यांच्या भाषणांनीं आत्मज्ञान झालेला तो चित्रकेतुराजा, सरोबराच्या चिखलांतून बाहेर निघणाऱ्या हत्तीप्रमाणें गृहरूप अंधकूपांतून बाहेर निघाला ॥ १५ ॥ पुढें त्यानें यमुनेमध्यें यथाविधि स्नान करून पापनाशक अशा पितृतर्पणादि जलक्रिया केल्या आणि मौनधारणपूर्वक इंद्रियसंयमन करून त्या ब्रह्मपुत्रांना प्रणाम केला ॥ १६ ॥ नंतर ज्यानें इंद्रियदमन केलें आहे व जो शरण आला आहे, अशा त्या भगवद्भक्त चित्रकेतुराजावर भगवान् नारदमुनि प्रसन्न झाले व त्यांनीं त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला॥१७॥नारद म्हणाला,—" हे भगवन्, चित्त, बुद्धि, मन व अहंकार ह्यांचे ठिकाणीं अनुक्रमानें वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध आणि संकर्षण ह्या रूपांनीं असलेला जो तूं त्या तुला आम्ही मनानें नमस्कार करितों ॥१८॥हे विज्ञानमय परमात्म्या,तुझ्यापासून द्वैतदृष्टि निवृत्त झाल्यामुळें आपल्याच ठिकाणीं तूं रममाण होत असल्यामुळें परमानंदरूप आहेस आणि म्हणूनच शांत आहेस. तस्मात् तुला नमस्कार असो ॥ १९ ॥ हे ईश्वरा, ज्या तूं स्वानंदानुभवानेंच मायानिमित्तक रागद्वेषादि लाटांचें निरसन केलें आहेस व जो तूं अंतर्यामिरूपानें इंद्रियांचा प्रवर्तक, व्यापक व जगद्रूपी आहेस, त्या तुज परमेश्वराला नमस्कार असो ॥२०॥ हे परमात्म्या, मनासह सर्व इंद्रियें तुझ्या स्वरूपाला प्राप्त न होतां उपराम पावलीं असतां, प्रकृत्यादि कारणांचा व देहादिक कार्याचा मूळ कारण आणि नामरूपरहित असा जो एक तूं चैतन्यरूपानें प्रकाश पावतोस, तो तूं आमचें रक्षण कर॥२१॥ हे ईश्वरा, हें कार्यकारणात्मक विश्व ज्याच्या ठिकाणीं असतें, ज्याचे ठिकाणीं लय पावतें व ज्याच्यापासून उत्पन्न होतें; जसें मातीच्या घटादिक पदार्थांमध्यें सर्वत्र माती असत्ये, त्याप्रमाणें जें सर्व ठिकाणीं व्यापून राहिलें आहे त्या तुज ब्रह्मस्वरूपाला नमस्कार असो ॥ २२ ॥ हे ईश्वरा, सर्व प्राणिमात्रांच्या आंत व बाहेर आकाशाप्रमाणें व्यापून असणाऱ्या ज्याला कर्मेंद्रियें स्पर्श करीत नाहींत व मन, बुद्धि आणि ज्ञानेंद्रियें ज्याला जाणत नाहींत, त्या ब्रह्मस्वरूपाला मी नमस्कार करितों ॥ २३ ॥ देह, इन्द्रियें, प्राण, मन व बुद्धि हे सर्व ब्रह्माच्या चैतन्यांशानें युक्त असतात तेव्हांच जाग्रत् व स्वप्न ह्या अवस्थांमध्यें आपल्या कर्माविषयीं त्यांची प्रवृत्ति होत नाहीं. न तापलेलें लोखंड जसें दाह करीत नाहीं, त्याप्रमाणें सुषुप्ति व मूर्च्छा इत्यादि अवस्थांमध्यें ते देहादिक कर्मांच्या

ठिकाणीं प्रवृत्त होत नाहींत. जाग्रदादि अवस्थांमध्यें साक्षी ही संज्ञाहि त्या ब्राह्मणालाच प्राप्त होत्ये ॥ २४ ॥ तस्मात् हे सर्वोत्कृष्टा ईश्वरा, सर्वश्रेष्ठ भक्तांचे समुदाय आपल्या करकमळाच्या कळ्यांनीं ज्याच्या दोन्ही चरणकमळांची सेवा करितात त्या महापुरुष, महापराक्रमी आणि ऐश्वर्याचा पति अशा तुज भगवंताला नमस्कार असो ॥ २५ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें नारदानें त्या शरण आलेल्या चित्रकेतु भक्ताला ह्या विद्येचा उपदेश केला आणि नंतर अंगिराऋषीसह तो ब्रह्मलोकीं गेला ॥२६॥ केवळ उदकाचें सेवन करून एकाग्र अंतःकरणानें युक्त अशा त्या चित्रकेतु-राजानें नारदानें उपदेश केलेल्या त्या विद्येचा सात दिवसपर्यंत यथासांग जप केला ॥२७॥ तेव्हां हे राजा, त्या जप केलेल्या विद्येच्या योगानें चित्रकेतुराजाला अकुंठित असें विद्याधरांचें आधिपत्य प्राप्त झालें ॥२८॥ नंतर कांहीं दिवसांनीं विद्येनें दीप्त झालेल्या मनानें गमन करणारा तो चित्रकेतुराजा देवाधिदेव शेषाच्या चरणांजवळ गेला ॥२९॥ तेथें त्यानें जो कमलकंदाप्रमाणें गौरवर्ण आहे, ज्यानें नीलवस्त्र परिधान केलें आहे, ज्यानें दैदीप्यमान किरीट, बाहुभूषण, कटिसूत्र व कडींतोडे हे अलंकार धारण केले आहेत आणि जो सनत्कुमारादि सिद्धाधिपतींच्या समूहांनीं वेष्टिलेला आहे, त्या प्रभूला अवलोकन केलें ॥३०॥ हे राजा, त्या प्रभूच्या दर्शनानें त्याचें सर्व पाप नाहींसें होऊन त्याचें अंतःकरण स्वच्छ व निर्मळ झालें. त्यानें मौन धारण केलें व त्याच्या नेत्रांमध्यें प्रेमामुळें आनंदाश्रु आले आणि त्याच्या शरिरावर रोमांच उभे राहिले. अशा स्थितींत चित्रकेतुराजानें त्या आदिपुरुष संकर्षणाला अत्यंत भक्तिपूर्वक शरण जाऊन प्रणाम केला ॥ ३१॥ परंतु प्रेमाश्रुबिंदूंनीं श्रेष्ठकीर्ति परमेश्वराच्या चरणकमलांच्या आसनाला वारंवार अभिषेक करीत असलेला तो चित्रकेतुराजा, प्रेमानें कंठ दाटून येऊन वर्णोच्चारण बंद पडल्यामुळें त्या प्रभूचें स्तवन करण्यास मात्र पुष्कळ वेळपर्यंत समर्थ झाला नाहीं ॥ ३२ ॥ पण थोड्या वेळानें त्यानें आपल्या बुद्धीनें मनाला वश करून सर्व इंद्रियांच्या बाह्य वृत्तींचा निरोध केला. तेव्हां भाषण करण्यास तो समर्थ झाला आणि त्या भक्तिप्रतिपादक अशा पंचरात्रादि शास्त्रोक्तरूपानें युक्त असलेल्या त्या जगद्गुरु परमेश्वराची स्तुति करूं लागला ॥ ३३ ॥

चित्रकेतु म्हणाला, —हे अजिता, देवादिकांना तूं अजिंक्य असतांहि अतिदयाळु असल्यामुळें इंद्रियदमन केलेल्या समदृष्टि भक्तांनीं तुला अगदीं स्वाधीन करून घेतलें आहे व तूंहि त्यांना अगदीं खरोखर वश केलें आहेस. कारण, निष्काम सेवा करणाऱ्या भक्तांना तूं आपलें स्वरूपच प्रत्यक्ष देतोस ॥ ३४ ॥ हे भगवन्, जगताची उत्पत्ति, स्थिति व लय ही सर्व खरोखर तुझीच लीला आहे व ब्रह्मादिक जगत्स्रष्टे हे ईश्वर नसून तुझ्या पुरुषरूप अंशाचेहि अंश आहेत; पण अशी स्थिति असतांहि ' आम्ही स्वतंत्र ईश्वर आहोंत' अशा अभिमानानें ते व्यर्थ स्पर्धा करीत असतात ॥ ३५ ॥ परमाणुरूप व अगदीं सूक्ष्म मूळ कारण आणि ब्रह्मांडरूप जें अगदीं शेवटचें अतिविस्तीर्ण कार्य ह्या उभयतांच्या आरंभीं, अंतीं व मध्यंतरीं तूंच असल्यामुळें आदि, अंत व मध्य हे तुला मुळींच नाहींत. ह्यावरून तूं नित्यच आहेस आणि ते परमाणुप्रभृति तुझ्यापासून उत्पन्न होत असल्यामुळें अनित्य

आहेत. कारण, सत्यत्वेंकरून प्रतीतीला येणाऱ्या कार्यरूप पदार्थांच्या आरंभीं व अंतीं जें नाशरहित असतें, तेंच मध्यस्थितींतहि नित्य असतें ॥ ३६ ॥ पहिल्यापहिल्यापेक्षां उत्तरोत्तर दहा दहा पट अधिक असलेल्या भूमिप्रभृति सात आवरणांनीं वेष्टिलेलें असें हें ब्रह्मांड, दुसऱ्या कोट्यवधि ब्रह्मांडांसह तुझ्या स्वरूपांत अगदीं परमाणुप्राय दिसतें; यास्तव तूं खरोखर अनंत आहेस ॥३७॥ हे ईशा, जे विषयेच्छु पुरुष तुज सर्वोत्कृष्ट परमेश्वराला न भजतां तुझ्या इंद्रादि विभूतींचीच उपासना करितात, ते खरोखर नराकार पशु होत. कारण, जसा राजकुलाचा नाश झाला म्हणजे सेवकांचे भोगहि नाहींसे होतात, त्याप्रमाणें उपास्यदेवतेचा नाश झाला म्हणजे उपासकांचेहि भोग नाश पावतात ॥ ३८ ॥ हे परमेश्वरा, जशी भाजलेल्या बीजांपासून अंकुरोत्पत्ति होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञानस्वरूप आणि निर्गुण अशा तुझ्या ठिकाणीं अर्पण केलेल्या विषयवासनाहि दुसऱ्या देहांच्या उत्पत्तीस कारण होत नाहींत. कारण, ह्या जीवाच्याच गुणसमुदायापासून संसारास कारण असे अहंताममतादिक द्वंद्वसमूह उत्पन्न होतात. यास्तव तुज निर्गुण परमेश्वराची सेवा कामनापूर्वक केली असतांहि हळूहळू निर्गुणत्वच प्राप्त होतें ॥ ३९ ॥ हे अपराजिता, ज्या वेळीं, तूं निर्दोष असा भागवतधर्म कथन केलास त्या वेळींच खरोखर तूं सर्वांना जिंकिलेंस. कारण, लोकैषणा, वित्तैषणा, पुत्रैषणा ह्यांनीं रहित आणि आत्मस्वरूपीं रममाण होणारे जे सनत्कुमारादि मुनि, ते सुद्धां मोक्षाकरितां त्या भागवतधर्माचेंच अद्यापि सेवन करितात ॥ ४० ॥ हे परमेश्वरा, इतर काम्यधर्मामध्यें जशी ‘ तूं आणि मी, माझें आणि तुझें’ अशी विषम बुद्धि उत्पन्न होत्ये, त्याप्रमाणें भागवतधर्मामध्यें पुरुषांना विषम बुद्धि होत नाहीं. हे भगवन्, शत्रुमरणादि कामनेनें सांगितलेला जो काम्यधर्म, तो रागद्वेषादिकांनीं युक्त असल्यामुळें फार अशुद्ध आहे. त्याचें फळ नश्वर असल्यामुळें तो विनाशी आहे आणि त्यामध्यें हिंसा वगैरे पुष्कळ असल्यामुळें तो अधर्मांनीं भरलेला आहे ॥ ४१ ॥ आपल्याला आणि दुसऱ्याला ज्यामध्यें पीडा होत्ये, अशा धर्मानें आपलें किंवा दुसऱ्याचें काय कल्याण व काय फळ होणार आहे ? कारण, अतिक्लेश भोगून जीवाला पीडा दिली असतां अधर्म होतो व तुलाहि पीडा होत्ये ॥ ४२ ॥ हे परमेश्वरा, जिच्या योगानें तूं भागवतधर्म सांगितला आहेस ती तुझी दृष्टि कधींहि परमार्थाला सोडून असत नाहीं. स्थावरजंगमात्मक प्राणिसमूहांच्या ठिकाणीं समबुद्धि ठेवणारे श्रेष्ठ भगवद्भक्त त्या भागवतधर्माचें सेवन करितात ॥ ४३ ॥ तस्मात् हे भगवन्, तुझ्या दर्शनापासून पुरुषांचीं सर्व पातकें नाहींशीं होतात, हें कांहीं अघटित नव्हे. कारण तुझें नांव एकदां ऐकिलें असतां निकृष्ट जातीचा चांडाळहि संसारापासून मुक्त होतो ॥ ४४ ॥ याकरितां हे भगवन्, तुझ्या अवलोकनानें आमच्या अंतःकरणांतील सर्व दोष आज नाहींसे होऊन आम्हीं कृतार्थ झालों आहों आणि असें होणें हें योग्यच आहे. कारण, तुमचा परमभक्त अशा देवर्षि नारदानें जें सांगितलें तें खोटें कसें होईल ? ॥ ४५ ॥ हे अनंता, ह्या संसारामध्यें लोक जें आचरण करितात तें तुज जगदात्म्याला सर्व विदितच आहे. जसा काजव्यांनीं सूर्याला मुळींच प्रकाश देणें शक्य

नाहीं, तसें तुज परमगुरूला तरी आम्ही कळविण्याजोगें काय बरें आहे ? ॥ ४६ ॥ हे भगवन्, सर्व जगताची उत्पत्ति, स्थिति व लय करण्यास समर्थ आणि भेददृष्टीच्या अधार्मिकांना ज्याचें आत्मतत्त्व समजत नाहीं, त्या अत्यंत शुद्ध अशा तुज भगवंताला नमस्कार असो ॥ ४७ ॥ जो हालचाल करूं लागला असतां ब्रह्मादिक जगत्स्रष्टे आपापले व्यापार करूं लागतात, जो अवलोकन करूं लागला असतां ज्ञानेंद्रियें आपापला विषय अवलोकन करितात, ज्याच्या मस्तकावर हें भूमंडळ मोहरीप्रमाणें भासत आहे आणि जो सहस्रमस्तकांनीं युक्त आहे, त्या तुज भगवंताला नमस्कार असो ॥ ४८ ॥

शुकाचार्य म्हणाले, —हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें चित्रकेतूनें उत्तम प्रकारें भगवान् अनंताची स्तुति केली असतां तो प्रसन्न होऊन विद्याधराधिपति चित्रकेतूला सांगूं लागला ॥ ४९ ॥

श्रीभगवान् म्हणाला, —हे राजा, नारद आणि अंगिराऋषि ह्यांनीं जो तुला उपदेश केला आहे त्याच्या योगानें, तसेंच नारदानें उपदेश केलेल्या विद्येच्या योगानें आणि माझ्या दर्शनानें तूं कृतार्थ झाला आहेस ॥ ५० ॥ हे राजा, भूतांचा प्रकाशक व भूतांचें कारण मीच असल्यामुळें सर्व भूतें व त्यांचा आत्मा मीच आहें. हे राजा, शब्दब्रह्म व परब्रह्म हीं दोन्ही माझींच नित्य स्वरूपें आहेत ॥ ५१ ॥ या भोग्य प्रपंचामध्यें भोक्तृरूपानें आत्माच सर्वत्र भरलेला असून तो प्रपंचहि आत्म्याच्याच ठिकाणीं भोक्तृरूपानें राहिलेला आहे. त्या उभयतांनाहि मी कारणरूपानें व्यापिलेलें असून तीं दोन्हीहि माझ्याच ठिकाणीं कल्पिलेलीं आहेत. ॥ ५२ ॥ हे राजा, जसा निजलेला पुरुष स्वप्नामध्यें दुसऱ्या देशांत असलेलें पर्वतवनादिरूप जग आपल्याच स्वरूपांत पाहतो, म्हणजे स्वप्नामध्येंच सुषुप्ति व स्वप्न अनुभवितो आणि त्या स्वप्नामध्येंच उठून ' मी शय्येवर बसलों आहें ' असें मानितो म्हणजे स्वप्नामध्येंच जाग्रदवस्थेचा अनुभव घेतो, त्याप्रमाणें प्रत्यक्ष जागरण वगैरे ह्या जीवोपाधिभूत बुद्धीच्याच अवस्था असून आत्म्याच्या ठिकाणीं त्या केवळ मायेनें कल्पिलेल्या आहेत असें जाणून, आत्मा हा त्यांचा द्रष्टा व त्या अवस्थांनीं रहित आहे असें समजावें ॥ ५३ ॥ ५४ ॥ हे राजा, निजलेला पुरुष ज्या स्वरूपानें त्या सुषुप्ति अवस्थेमध्यें आपल्या गाढ निद्रेला व अतीन्द्रिय सुखाला जाणतो, तें आत्मस्वरूप ब्रह्म मीच आहें असें जाण ॥ ५५ ॥ हे राजा, निद्रा व जागरण ह्या दोन्ही अवस्थांचें अनुसंधान राखणाऱ्या पुरुषाच्या त्या दोन्ही अवस्थांमध्यें जें ज्ञान प्रकाशकरूपानें असून त्यांहून भिन्न असतें, तेंच ज्ञान व तेंच परब्रह्म होय ॥ ५६ ॥ आतां मीं सांगितलेल्या मद्रूप ब्रह्माचें पुरुषाला विस्मरण होऊन तो स्वतःला आत्मस्वरूपाहून निराळा मानूं लागेल तर, त्याला जन्मानंतर जन्म व मरणानंतर मरण असा संसार प्राप्त होईल ॥ ५७ ॥ हे राजा, ह्या भरतखंडामध्यें जिच्यामध्यें शास्त्रोक्त ज्ञान व अपरोक्ष ज्ञान होण्याचा संभव आहे अशी मनुष्ययोनि प्राप्त झाली असतां, जो आत्मज्ञान करून घेत नाहीं, त्याला कोणत्याहि योनीमध्यें मोक्षप्राप्ति होत नाहीं ॥ ५८ ॥ याप्रमाणें प्रवृत्तिमार्गामध्यें अतिक्लेश असून त्यामध्यें इच्छिलेल्याच्या उलट फल प्राप्त होतें आणि

निवृत्तिमार्गामध्यें मोक्षप्राप्ति होते, हें जाणून विवेकी पुरुषानें वासनेचा त्याग करावा ॥ ५९ ॥ स्त्री व पुरुष उभयतां सुखप्राप्ति व दुःखनिवृत्ति होण्याकरितां नाना प्रकारचीं कर्मे करीत असतात; परंतु त्यांपासून त्यांच्या दुःखाची निवृत्ति होत नाहीं व सुखाची प्राप्तिहि होत नाहीं ॥ ६० ॥ याप्रमाणें उद्योगांत आम्ही प्रवीण आहों असा अभिमान बाळगणाऱ्या पुरुषांना फलप्राप्ति होत नाहीं हें जाणून व जाग्रदादि अवस्थात्रयाहून निराळें चौथें असें आत्म्याचें सूक्ष्म स्वरूप आहे हें लक्षांत घेऊन, पुरुषानें विवेकाच्या योगानें ऐहिक व पारलौकिक ह्या विषयांपासून अगदीं मुक्त व्हावें आणि शास्त्रोक्त ज्ञान व अपरोक्ष ज्ञान ह्या दोहोंच्या योगानें जो संतुष्ट होतो तोच माझ्या सेवेविषयीं तत्पर असा माझा भक्त होतो ॥ ६१ ॥ ६२ ॥ हे राजा, योगमार्गांत ज्यांची बुद्धि तीक्ष्ण आहे अशा पुरुषांनीं, परमात्मा सर्वत्र एकरूपानें व्यापून राहिला आहे असें जाणणें, हा इतकाच सर्व प्रकारच्या प्रयत्नांनीं साध्य करावयाचा पुरुषार्थ आहे असें समजावें ॥ ६३ ॥ यास्तव हे राजा, तूं सावधानचित्त होऊन श्रद्धेनें हें माझें उपदेशरूप भाषण धारण कर; म्हणजे ज्ञान व विज्ञान ह्यांनीं युक्त होऊन तूं लवकरच माझ्या स्वरूपाला पावशील ॥ ६४ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें चित्रकेतुराजाला आश्वासन देऊन त्याच्या समक्षच तो जगद्गुरु विश्वात्मा भगवान् श्रीहरि अंतर्धान पावला ॥ ६५ ॥

## सोळावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १७ वा

श्रीशुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, ज्या दिशेकडे तो भगवान् अनंत गुप्त झाला होता त्या दिशेला नमस्कार करून तो चित्रकेतु विद्याधर आकाशमार्गानें संचार करूं लागला ॥ १ ॥ अनंत लक्ष वर्षेपर्यंत त्याचें बल व इंद्रियसामर्थ्य कुंठित झालें नाहीं. मुनि, सिद्ध व चारण हे त्याची नित्य स्तुति करीत असतात. असा तो महायोगी चित्रकेतु, भक्तदुःखनिवारण करणाऱ्या ईश्वराचें गायन करीत ज्यामध्यें संकल्पमात्रेंकरूनच नाना प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात अशा मेरुपर्वताच्या गुहांमध्यें विद्याधरांच्या स्त्रियांसह क्रीडा करीत राहता झाला ॥ २ ॥ ३ ॥ एके दिवशीं विष्णूनें दिलेल्या दिव्य विमानांत बसून तो संचार करीत असतां, सिद्धचारणांनीं वेष्टिलेल्या आणि ऋषींच्या सभेमध्यें पार्वतीला मांडीवर घेऊन व बाहूनें तिला आलिंगन देऊन बसलेल्या महादेवाला त्यानें पाहिलें आणि देवी पार्वती ऐकत असतां तिच्या समीप तो उच्चस्वरानें हास्य करून बोलूं लागला ॥ ४ ॥ ५ ॥

चित्रकेतु म्हणाला,— अहो, सर्व लोकांचा साक्षात् गुरु देहधारी मनुष्यांमध्यें मुख्य व सर्वांना धर्म सांगणारा असा हा शंकर, आपणच सभेमध्यें भार्येशीं संलग्न होऊन बसला आहे ! ॥ ६ ॥ अहो, हा जटा धारण करून तीव्र तपश्चर्या करणारा, ब्रह्मवादी व सभापति असून एखाद्या विषयासक्त पुरुषाप्रमाणें अगदीं निर्लज्ज होऊन स्त्रीला मांडीवर घेऊन बसला आहे ! ॥ ७ ॥ अहो काय सांगावें ? अतिनिकृष्ट लोक सुद्धां बहुतकरून एकांतामध्येंच स्त्रीला अंकावर घेतात आणि हा तर महाव्रतस्थ असून अगदीं सभेमध्यें स्त्रीला अंकावर धारण करीत आहे ! ॥ ८ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, तें त्याचें भाषण ऐकून गंभीर बुद्धीचा भगवान् महादेव व त्याचे अनुयायी सर्व सभासद, सभेमध्यें मौन धारण करून राहिले ॥ ९ ॥ याप्रमाणें महादेवाचा प्रभाव न जाणून त्यानें फारच वाईट भाषण केलें असतां, 'मी जितेंद्रिय आहे' म्हणून व्यर्थ अभिमान बाळगणाऱ्या त्या उद्धट चित्रकेतुराजाला देवी पार्वती क्रोधानें उत्तर देऊं लागली ॥ १० ॥

पार्वती म्हणाली,—अहो, सांप्रत या लोकीं दंडधारी राजा आणि आम्हांसारिख्या निर्लज्ज दुष्टांचा अतिशय निषेध करणारा असा हाच शास्ता आहे काय ? ॥ ११ ॥ अहो, कमलयोनि ब्रह्मदेव, तसेंच भृगु व नारदप्रभृति ब्रह्मपुत्र सनत्कुमार, कपिल आणि मनु हेसुद्धां शास्त्राचें अतिक्रमण करून वागणाऱ्या महादेवाचें निवारण करीत नाहींत, त्यांना धर्म समजत नाहीं कीं काय ? ॥ १२ ॥ सारांश, ज्या ब्रह्मादिकांनींहि ज्याच्या चरणकमळांचें ध्यान करणें योग्य आहे अशा ह्या परम धर्ममूर्ति जगद्‌गुरु महादेवाला ज्या अर्थी हा स्वतः क्षत्रियाधम चित्रकेतु ब्रह्मादिकांना अज्ञानी समजून निःशंकपणें शिकवूं पाहात आहे, त्या अर्थी

ह्याला दंड करणें हेंच योग्य आहे ॥ १३ ॥ हे सभासद हो, साधूंनीं सेविलेल्या अशा श्रीविष्णूच्या चरणांसमीप प्राप्त होण्यास हा योग्य नाहीं. कारण, 'मी श्रेष्ठ आहें' असें ह्याला वाटत असल्यामुळें हा उद्धट झाला आहे ॥ १४ ॥ यास्तव, हे दुर्मते चित्रकेतो, तूं महापातकी अशा असुरयोनीमध्यें जन्म घे! म्हणजे, हे पुत्रा, तूं फिरून या लोकीं मोठ्या लोकांचा असा अपराध करणार नाहींस! ॥१५॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें पार्वतीनें चित्रकेतूला शाप दिला असतां तो विमानांतून खालीं उतरला आणि मस्तक नम्र करून त्या सतीला प्रसन्न करूं लागला ॥ १६ ॥

चित्रकेतु म्हणाला, हे अंबिके, मी आपल्या ओंजळीनें तुझ्या शापाचा स्वीकार करितों. कारण, आम्हां मर्त्यांना जें सुख किंवा दुःख सांगितलेलें असतें, तें त्याला पूर्वकर्मानेंच प्राप्त झालेलें असतें ॥ १७ ॥ आणि हा तर संसारचक्राचा स्वभावच आहे, तेव्हां ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, अज्ञानानें मोहित झालेला प्राणी ह्या संसारचक्रामध्यें भ्रमण करीत असतांना सर्वठिकाणीं आणि सर्वकाळीं सुखदुःखाचा उपभोग घेतच असतो ॥ १८ ॥ यास्तव मीं अयोग्य भाषण केलें व तूं मला शाप दिलास, ह्यामध्यें माझा आणि तुझाहि मुळींच दोष नाहीं. कारण, ह्या संसारामध्यें सुखाचा कर्ता आपण स्वतः व दुःखाचा कर्ता कोणी अन्य, असें वास्तविक मुळींच नसून जो पुरुष अतिमूर्ख असतो तोच आपल्याला व दुसऱ्याला अनुक्रमानें सुखाचा आणि दुःखाचा कर्ता असें मानितो ॥ १९ ॥ हे अंबिके, ह्या गुणप्रवाहरूप संसारामध्यें पडलेल्या जीवाला प्राप्त होणारीं, शाप, अनुग्रह, स्वर्ग, नरक, सुख, दुःख हीं द्वंद्वें सर्व खरीं आहेत काय? ॥२० ॥ हे देवि, स्वतः बंधादि शून्य असा एक भगवान् परमेश्वरच आपल्या निमित्तभूत मायेच्या योगानें प्राणी आणि त्यांचे बंध व मोक्ष, सुख व दुःख हे उत्पन्न करितो ॥ २१ ॥ जरी ईश्वराच्या ठिकाणीं प्रिय आणि अप्रिय हीं दोन्ही नाहींत तथापि प्राण्यांला आपल्या कर्मानुसार सुख अथवा दुःख इत्यादि सर्व भोगावें लागतें. हे माते, त्या ईश्वराला प्रिय-अप्रिय, ज्ञाति-बंधु, स्वकीय अथवा परकीय असा कोणीहि नाहीं; म्हणून सर्व ठिकाणीं सम व निःसंग अशा त्याला संगनिमित्तक सुखाविषयीं प्रीतीच जर नाहीं, तर त्या प्रीतीपासून उत्पन्न होणारा क्रोध कोठून असणार? ॥ २२ ॥ असें जरी आहे, तथापि त्याच्या मायेनें उत्पन्न झालेलें जें पुण्यपापरूप कर्म तेंच ह्या प्राण्यांच्या सुखःदुखांना, हिताहिताला, बंधमोक्षाला, जन्ममृत्यूला व संसाराला कारण होतें ॥ २३ ॥ यास्तव हे कोपिष्ठ पतिव्रते, शापापासून मुक्त होण्याकरितां मी तुझी प्रार्थना करीत नसून माझें भाषण योग्य असतांहि तूं तें अयोग्य असल्यासारखें मानीत आहेस, त्या अर्थी त्याची मात्र तूं क्षमा कर, एवढीच मी तुझी प्रार्थना करितों ॥ २४ ॥

शुकाचार्य म्हणाले, —हे शत्रुदमना राजा, ह्याप्रमाणें ईश्वरपार्वतींना प्रसन्न करून चित्रकेतुराजा तीं उभयतां विस्मय करीत असतां त्यांच्या समक्ष आपल्या विमानांत बसून निघून गेला ॥ २५ ॥ नंतर देव, ऋषि, दैत्य, सिद्ध आणि पार्षदगण हे सर्व श्रवण करीत असतां भगवान् रुद्र पार्वतीला सांगूं लागला ॥ २६ ॥

रुद्र म्हणाला, —हे सुंदरि, अद्भुत कर्म करणाऱ्या श्रीहरीच्या श्रेष्ठ व निःस्पृह दासानुसदासांचें माहात्म्य तूं अवलोकन केलेंस ना ? ॥ २७ ॥ कारण स्वर्ग, मोक्ष आणि नरक हे सर्व आपल्याला सारखेच आहेत असें मानण्याचा ज्यांचा स्वभावच पडून गेला, आहे, ते नारायणाचे परमभक्त, कोणतेंहि भय बाळगीत नाहींत ॥ २८ ॥ हे पार्वति, ईश्वराच्या मायेनेंच जीवांना देहसंयोगापासून सुखदुःख, जन्ममरण आणि शाप व अनुग्रह अशीं द्वंद्वें प्राप्त होत असून, जसा पुरुषाला स्वप्नामध्यें आपल्या ठिकाणींच 'मी राजा आहें किंवा रंक आहें' अशा बुद्धीनें सुखदुःखाचा भेद भासतो अथवा जाग्रद-वस्थेमध्यें जसा अज्ञानामुळें माळेच्या ठिकाणीं सर्पाचा भास होतो, त्याचप्रमाणें त्या द्वंद्वांच्या ठिकाणींहि त्याला अविवेकानें गुणदोषांचा भेद उत्पन्न होतो ॥ २९ ॥ ३० ॥ यास्तव ज्ञान व वैराग्य ह्यांच्या बलानें युक्त असून भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं जे भक्ति करीत आहेत त्या पुरुषांना ह्या संसारामध्यें चांगला म्हणून आश्रय करण्यास योग्य असा कोण-ताहि पदार्थ नाहीं ॥ ३१ ॥ मी, ब्रह्मदेव, सनत्कुमार, नारद, ब्रह्मपुत्र, मुनि व इंद्रादिक सर्व देव हे कोणीही त्याचा अभिप्राय व लीला जाणण्यास समर्थ नाहीं. तेव्हां त्यांच्या अंशांचे अंशभूत असूनहि 'आम्हीच स्वतंत्र ईश्वर आहोंत' असा अभिमान बाळगणारे लोक त्याचें स्वरूप कसें जाणतील ? ॥ ३२ ॥ त्या परमेश्वराला प्रिय आणि अप्रिय अथवा स्वकीय, परकीय असा कोणीहि नाहीं; तो सर्व प्राण्यांच्या अंतर्यामीं असल्यामुळें त्या श्रीहरीला सर्वच प्रिय आहेत ॥ ३३ ॥ हे पार्वति, सर्वत्र समदृष्टि आणि शांत असा हा भाग्यवान् चित्रकेतुराजा, त्या परमेश्वराचा भक्त असल्यामुळें त्याला प्रिय आहे व मीहि त्या अच्युताला प्रिय आहें. ह्याकरितांच ह्या चित्रकेतूवर मी क्रुद्ध झालों नाहीं॥ ३४ ॥ यास्तव शांत, समदृष्टि व विष्णुभक्त अशा महात्म्या पुरुषांविषयीं तूं आश्चर्य मानूं नकोस ॥ ३५॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें भगवान् शिवाचें भाषण ऐकून, उमा-देवीचा विस्मय नाहींसा झाला व तिचें मनहि शांत झालें ॥ ३६ ॥ असो. याप्रमाणें उलट शाप देण्यास पूर्ण समर्थ असूनहि भगवद्भक्त अशा त्या चित्रकेतूनें त्या देवीचा शाप शिरसा-मान्य केला. कारण, दुसऱ्यांनीं अपकार केला असतांहि उलट आपण अपकार न करणें हेंच साधूंचें लक्षण होय ॥३७॥ असो. पुढें तो चित्रकेतु असुरयोनीचा आश्रय करून शास्त्रोक्त व अपरोक्षज्ञानासह त्वष्ट्याच्या दक्षिणाग्नीमध्यें उत्पन्न होऊन 'वृत्रासुर' या नांवानें प्रसिद्ध झाला ॥ ३८ ॥ हे राजा, वृत्रासुराची असुरयोनींत उत्पत्ति होण्याचें व त्याची भगवंताच्या ठिकाणीं भक्ति असण्याचें कारण जें तूं मला विचारिलेंस, तें हें मीं सर्व तुला सांगितलें आहे ॥ ३९ ॥ हे राजा, महात्म्या चित्रकेतूचा हा पुण्यकारक इतिहास व विष्णुभक्ताचें माहात्म्य श्रवण केलें असतां प्राणी कर्मबंधापासून मुक्त होतो ॥ ४०॥ तसेंच प्रातःकाळीं उठून आणि श्रीहरीचें स्मरण करून कांहींएक भाषण न करतां जो पुरुष नियमानें या इतिहासाचें पठण करील, त्याला उत्कृष्ट गति प्राप्त होईल ॥ ४१ ॥

**॥ सतरावा अध्याय समाप्त ॥**

# अध्याय १८ वा

शुकाचार्य म्हणाले,–हे राजा, सवितानामक पांचव्या आदित्याच्या पृश्नि नांवाच्या भार्येला सावित्री, व्याहृति, त्रयी, अग्निहोत्र, पशु, सोम, चातुर्मास्य व पंचमहायज्ञ अशीं अपत्यें झालीं ॥ १ ॥ हे राजा, भगनामक सहाव्या आदित्याच्या सिद्धिनामक भार्येला महिमा, विभु, प्रभु हे पुत्र आणि सौंदर्यसंपन्न व उत्तम व्रत धारण करणारी आशीर्नामक कन्या अशीं अपत्यें झालीं ॥ २ ॥ धातानामक सातव्या आदित्याच्या कुहू, सिनीवाली, राका आणि अनुमति ह्या चार भार्यांना अनुक्रमें सायंकाल, दर्श, प्रातःकाळ आणि पूर्णमास हे पुत्र झाले ॥ ३ ॥ त्यानंतरचा विधातानामक जो आठवा आदित्य त्यानें आपल्या क्रियानामक भार्येच्या ठिकाणीं पुरीष्य नांवाचे पंचचित्त अग्नि उत्पन्न केले व वरुणनामक नवव्या आदित्याची चर्षणीनामक भार्या होती तिच्यापासून त्याला पूर्वी ब्रह्मदेवाचा पुत्र असलेला भृगुऋषि पुनः झाला ॥ ४ ॥ पूर्वी वारुळापासून उत्पन्न झालेला जो महायोगी वाल्मीकि तोहि वरुणाचाच पुत्र होय. अगस्त्य आणि वसिष्ठ हे दोन ऋषि मित्र आणि वरुण ह्या उभयतांचे मिळून पुत्र होत. कारण, उर्वशीसमीप पतन पावलेलें वीर्य त्या उभयतांनीं कुंभांमध्यें धारण केलें व त्यापासून ते उत्पन्न झाले. असो. मित्रानें आपल्या रेवतीनामक भार्येच्या ठिकाणीं दुसरे उत्सर्ग, अरिष्ट आणि पिप्पल असे तीन पुत्र उत्पन्न केले ॥ ५ ॥ ६ ॥ हे राजा, इंद्रनामक अकराव्या समर्थ आदित्यानें आपल्या पौलोमीनामक भार्येच्या ठिकाणीं जयंत, ऋषभ आणि तिसरा मीढुष असे तीन पुत्र उत्पन्न केले, असें आमच्या ऐकण्यांत आहे ॥ ७ ॥ मायेनें वामनरूप धारण केलेला जो भगवदवताररूप त्रिविक्रम नांवाचा बारावा आदित्य त्याच्या कीर्तिनामक पत्नीपासून त्याला बृहच्छ्लोक नांवाचा पुत्र झाला व त्या बृहच्छ्लोकालाहि सौभाग्य आदिकरून पुत्र झाले ॥ ८ ॥ त्या महात्म्या वामनानें अदितीच्या पोटीं कसा अवतार धारण केला तो प्रकार व त्याचीं कर्में, गुण आणि प्रभाव हे कसे होते हें सर्व मी तुला पुढें सांगेन* ॥९॥ हे राजा, आतां ज्यांच्या कुळामध्यें श्रीमान् भगवद्भक्त प्रल्हाद व बलि हे होऊन गेले असे दितीपासून झालेले कश्यपाचे पुत्र मी तुला सांगतों ॥ १० ॥ प्रथम दैत्यांना व दानवांना पूज्य असे हिरण्यकशिपु आणि हिरण्याक्ष या नांवांचे दोन पुत्र दितीला झाले. त्यांचा वृत्तान्त मीं पूर्वींच सांगितला आहे+ ॥ ११ ॥ कयाधुनामक दानवी जंभासुराची कन्या असून त्यानें ती हिरण्यकशिपूला भार्या म्हणून दिली होती. त्याला तिच्यापासून चार पुत्र झाले ॥ १२ ॥ त्यांचीं नांवें संह्लद, अनुह्लद, ह्लद आणि प्रह्लद अशीं

---

* ही कथा पुढें आठव्या स्कंधांत आली आहे.

+ तिसरा स्कंध पाहा.

होत. त्यांची सिंहिकानामक एक भगिनी होती, तिला विप्रचित्‌नामक दैत्यापासून राहु हा पुत्र झाला. तो अमृतपान करीत असतांना श्रीहरीनें चक्राच्या योगानें त्याचें मस्तक छेदिलें संह्रादाच्या कृतिनामक भार्येला पंचजन नांवाचा पुत्र झाला ॥ १३ ॥ १४ ॥ ह्रादाची धमनिनामक भार्या होती; तिला अतिथिरूपानें प्राप्त झालेल्या अगस्त्यऋषीला मारण्याकरितां मेषरूप धारण केलेल्या वतापीचा ज्यानें पाक केला होता तो इल्वल आणि ज्याचा पाक केला तो वातापि असे दोन पुत्र झाले ॥ १५ ॥ अनुह्रादाला सूर्म्यानामक भार्येपासून बाष्कल आणि महिष असे दोन पुत्र झाले. विरोचन हा तर प्रह्लादाचा पुत्र असून त्याला देवीनामक भार्येपासून बलिनामक पुत्र झाला ॥ १६ ॥ त्या बलीपासून अशननामक भार्येच्या पोटीं शंभर पुत्र झाले. त्यांत बाण हा वडील होता. हे राजा, पुण्यकारक कीर्तीला योग्य असा त्या बलीचा प्रभाव मी तुला पुढें सांगेन * ॥१७॥ बाणासुरानें कैलासनाथ महादेवाचें आराधन करून त्याच्या गणांमध्यें मुख्यपद मिळविलें व अद्यापि भगवान् शिव त्याच्या जवळ राहात असून त्याच्या नगराचें रक्षण करीत आहे ॥ १८ ॥ दितीला आणखी मरुत् नांवाचे एकुणपन्नास पुत्र झाले. ते सर्व संततिरहित असून इंद्रानें त्यांना आपल्यासारखें देव केलें ॥ १९ ॥

राजा म्हणाला, हे शुकाचार्या, मरुतांनीं स्वाभाविक अशा आपल्या आसुरस्वभावाचा त्याग कसा केला व इंद्रानें त्यांना देवपण कसें दिलें आणि त्यांनीं इन्द्रावर काय काय उपकार केले, हें जाणण्याची मला इच्छा आहे व हे ऋषि देखील तशीच इच्छा करीत आहेत. यास्तव हे ब्रह्मनिष्ठ भगवंता, हें तूं आम्हांला कथन कर ॥ २० ॥ २१ ॥

सूत म्हणाला,—हे शौनक हो, आदरयुक्त, मित व अर्थानें भरलेलें असें तें परीक्षित्‌राजाचें भाषण श्रवण करून त्या सर्वज्ञ व्यासपुत्रानें आनंदपूर्ण अंतःकरणानें त्याचा सत्कार करीत उत्तर दिलें ॥ २२ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, इंद्राच्या पाठीशीं राहून त्याला साहाय्य करणाऱ्या विष्णूनें दितीचे पुत्र मारविले असतां शोकानें प्रदीप्त झालेल्या क्रोधानें संतप्त होऊन ती दिति मनांत म्हणूं लागली ॥ २३ ॥ "अहो, विषयासक्त, क्रूर स्वभावाचा, कठिण चित्तानें युक्त आणि भ्रातृघातकी अशा या इंद्राला मारवून मी कधीं बरें सुखी होईन ? ॥ २४ ॥ अहो, पूर्वकालीन राजांच्या देहाविषयीं विचार केला तर असें दिसून येतें कीं, ज्याला पूर्वी ' प्रभु ' असें म्हणत असतात तोच देह, मरणानंतर दोन तीन दिवस राहिल्यानें कृमि, श्वान इत्यादिकांनीं भक्षण केला असतां विष्ठा आणि दग्ध झाला असतां भस्म अशीं नांवें पावतो. अशा ह्या देहाकरितां जो भूतांचा द्रोह करितो तो आपला स्वार्थ तरी जाणतो काय ? कारण, भूतद्रोहापासून केवळ नरकच प्राप्त होतो ॥ २५ ॥ यास्तव हे देहादिकच नित्य आहेत असें मानीत असल्यामुळें ज्याचें चित्त उच्छृंखल झालें आहे, त्या इंद्राचा मद नाहींसा करणारा असा पुत्र मला कोणत्या उपायानें होईल बरें ? खरोखर

* आठव्या स्कंधांत ही कथा आली आहे.

अशा प्रकारचा पुत्र होण्यास भर्त्याचें प्रिय करणें ह्यावांचून इतर साधन नाहीं ॥ २६ ॥ असें मनांत आणून ती दिति, शुश्रूषा, प्रेम, विनय आणि इंद्रियदमन ह्यांच्या योगानें भर्त्याचें निरंतर प्रिय करूं लागली ॥ २७ ॥ आणि हे राजा, असें होतां होतां पतीचा अभिप्राय जाणणाऱ्या त्या दितीनें उत्कृष्ट भक्ति, मनोहर आणि मधुर अशीं वचनें व सुंदर हास्यपूर्वक कटाक्ष ह्यांच्या योगानें कश्यपाचें मन वश केलें ॥ २८ ॥ ह्याप्रमाणें शुश्रूषादिकांनीं त्या चतुर स्त्रीनें ज्ञानी कश्यपालाहि मोहित करून टाकिलें असतां, त्यानें स्त्रीच्या आधीन होऊन 'ठीक आहे, मी तुझे मनोरथ पूर्ण करीन' असें तिला सांगितलें. अर्थात् ही गोष्ट स्त्रीच्या संबधीं आश्चर्याची नव्हे ॥ २९ ॥ कारण, सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मदेवानें सर्व प्राणी निःसंग आहेत असें पाहून मैथुनधर्मानें सृष्टि वाढविण्याकरितां आपल्या अर्ध्या देहाचीच स्त्री बनविली, व तेव्हांच तिनें पुरुषाची मति हरण केली ॥ ३० ॥ असो. हे परीक्षित्राजा, ह्याप्रमाणें दितीनें भगवान् कश्यपाची शुश्रूषा केली असतां तो अत्यंत प्रसन्न झाला आणि हास्यपूर्वक दितीची प्रशंसा करून तिच्याशीं बोलूं लागला ॥ ३१ ॥

कश्यप म्हणाला,—हे सुंदरि, तूं निर्दोष असून मी तुजवर प्रसन्न झालों आहें; याकरितां तूं वर माग. कारण, भर्ता सुप्रसन्न झाला असतां इहलोकसंबंधीं अथवा परलोकसंबंधीं कोणता मनोरथ स्त्रीला दुर्लभ आहे बरें? ॥ ३२ ॥ हे सुंदर स्त्रिये, पति हेंच स्त्रियांचें परम दैवत आहे असें सांगितलें आहे. आतां सर्वांच्या मनामध्यें असलेला श्रीपति वासुदेवच सर्व प्राण्यांचें परम दैवत असल्याचें प्रसिद्ध आहे, व तें म्हणणेंहि सत्य आहे ॥ ३३ ॥ कारण, नामें आणि रूपें ह्यांच्या योगानें नाना प्रकारांनीं कल्पिलेल्या देवतारूपांनीं पुरुष त्याच भगवंताचें पूजन करीत असतात; आणि स्त्रियाहि त्याच पतिरूपधारी भगवंताचें पूजन करितात ॥ ३४ ॥ यास्तव हे सुंदरि, आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा करणाऱ्या पतिव्रता स्त्रिया, अनन्यभावानें पतिरूपी सर्वात्म्या ईश्वराचें पूजन करितात ॥ ३५ ॥ त्याचप्रमाणें, हे भद्रे, ज्या अर्थी मोठ्या भक्तीनें तूं माझें अर्चन केलें आहेस, त्या अर्थी असाध्वी स्त्रियांस अत्यंत दुर्लभ असा मी तुझा मनोरथ पूर्ण करीन ॥ ३६ ॥

दिति म्हणाली,—हे ब्रह्मन्, आपण जर मला वर देत असाल तर, ज्यानें विष्णूच्या साहाय्यानें माझ्या दोन पुत्रांचा घात केल्यामुळें मी मृतपुत्र झाल्यें आहें त्या इंद्राला मारणारा असा एक मृत्युरहित पुत्र मी मागत्यें ॥ ३७ ॥ हे राजा, तें वचन श्रवण करितांच तो कश्यप विप्र मनामध्यें खिन्न होऊन संतप्त झाला आणि आपल्या मनामध्यें म्हणाला, 'अहो, फार मोठा अधर्म आज मला प्राप्त झाला!' ॥ ३८ ॥ अरे, काय आश्चर्य हें! विषयासक्त झाल्यामुळें माझा विवेक नष्ट होऊन स्त्रीरूप मायेनें ह्या प्रसंगीं माझें मन अगदीं वश करून टाकिलें, यास्तव मी निःसंशय आज नरकामध्यें पडणार! ॥ ३९ ॥ अहो, खरोखर पाहूं गेलें असतां, आपल्या स्वभावाप्रमाणें वागणाऱ्या स्त्रीचा ह्यामध्यें काय बरें अपराध आहे? ज्या अर्थी इंद्रियांच्या आधीन होऊन मीच स्वार्थाविषयीं

मूढ झालों, त्या अर्थी मलाच धिक्कार असो ! ॥ ४० ॥ अरे, स्त्रियांचें मुख पाहावें तर अगदीं शरदृतूंतील कमलाप्रमाणें विकसित असतें; भाषण ऐकावें तर अमृताप्रमाणें कर्णाला मधुर लागणारें असतें; परंतु हृदयाविषयीं जर विचार केला तर तें मात्र अगदीं वस्तऱ्याच्या धारेसारखें तीक्ष्ण असतें. यास्तव स्त्रियांचें कृत्य कोण बरें जाणत असेल ? ॥ ४१ ॥ अहो, स्वार्थाच्या कामनेमुळें साक्षात् आत्म्याप्रमाणें ज्या अत्यंत प्रिय वाटतात, अशा स्त्रियांना वस्तुत: कोणीहि प्रिय नाहीं. कारण, स्वार्थाकरितां पतीचा, पुत्राचा अथवा भ्रात्याचा त्या आपण स्वत: घात करितात किंवा दुसऱ्याकडूनहि करवितात ॥ ४२ ॥ असो. आतां वर देतों म्हणून जी मीं प्रतिज्ञा केली आहे, तें माझें भाषण असत्य होऊं नये व इंद्र हा देवराज असल्यानें वधाला योग्य नसल्यामुळें त्याचाहि वध होऊं नये, ह्या दोन्ही गोष्टी सिद्धीस जाण्याविषयीं वैष्णवव्रताचा ह्या दितीला आपण उपदेश करावा म्हणजे त्याच्या योगानें हिचें चित्त शुद्ध होईल आणि हिचा इंद्राविषयीं क्रोध नाहींसा होईल व मृत्युरहित असा हिला पुत्रहि प्राप्त होईल. त्या व्रताला दीर्घ काळ लागत असल्यामुळें कांहीं तरी त्यांत वैगुण्य प्राप्त झालें म्हणजे इंद्राचाहि वध होणार नाहीं. तरी ह्या प्रसंगीं असें करणेंच योग्य दिसतें ॥ ४३ ॥ हे कुरुनंदना, याप्रमाणें भगवान् मरीचिपुत्र कश्यप मनाशीं विचार करीत किंचित् क्रुद्ध होऊन स्वत:ची निंदा करीत करीत तिला बोलूं लागला ॥ ४४ ॥

कश्यप म्हणाला, —हे भद्रे, मी सांगतों हें व्रत जर तूं एक वर्षपर्यंत अगदीं यथाशास्त्र आचरण करिशील तर तुला इंद्राला मारणारा पुत्र होईल; परंतु त्या व्रतांत जर कांहीं वैगुण्य झालें तर तो पुत्र देवांचा पक्षपाती होईल ॥ ४५ ॥

दिति म्हणाली, —हे ब्रह्मन्, आपण सांगाल तें व्रत मी धारण करीन. यास्तव ह्या व्रताविषयीं आवश्यक कृत्यें कोणतीं, निषिद्ध कृत्यें कोणतीं आणि व्रतविघात न करणारीं अशीं आवश्यक नसणारीं व निषिद्धहि नसणारीं अशीं विहित कृत्यें कोणतीं, तीं सर्व आपण मला कथन करावीं ॥ ४६ ॥

कश्यप म्हणाला,—हे कल्याणि, प्राणिमात्रांपैकीं कोणाचीहि हिंसा करूं नये, कोणाला शाप देऊं नये, खोटें भाषण करूं नये, नखें व केंस यांचें छेदन करूं नये ॥४७॥ तसेंच उदकामध्यें शिरून स्नान करूं नये, कोणावर कोप करूं नये, दुर्जनाशीं संभाषण करूं नये, धुतलेलें नसेल तें वस्त्र परिधान करूं नये आणि एकदां धारण केलेली फुलांची माळ पुन: धारण करूं नये ॥ ४८ ॥ त्याचप्रमाणें उष्टें, भद्रकालीदेवीला अर्पण केलेलें, मांसानें युक्त, शूद्रानें आणिलेलें आणि रजस्वलेनें अवलोकन केलेलें असें अन्न भक्षण करूं नये. ओंजळीनें उदक पिऊं नये ॥ ४९ ॥ तसेंच तोंड उष्टें असतां, हातपाय धुतले नसतां, संध्याकाळ असतां, केंस मोकळे असतां, अलंकार धारण केले नसतां, मौनव्रत ग्रहण केलें नसतां आणि अंगावर पांघरण्यास कांहीं वस्त्र घेतलें नसतां कधींहि गृहांतून बाहेर जाऊं नये ॥ ५० ॥ त्याचप्रमाणें हस्तपादप्रक्षालन न करितां, असावध असतां, पाय ओले असतां, उत्तरेस मस्तक असतां, पश्चिमेस मस्तक असतां, इतराशीं संलग्न असतां, नग्न असतां आणि संध्याकाळ असतां कधींहि शयन करूं नये ॥ ५१ ॥ असो. याप्रमाणें

सांगितलेल्या निषेधांचें परिपालन करावें आणि धौतवस्त्र परिधान करून शुचिर्भूत राहून सौभाग्यादि सर्व मंगलांनीं युक्त होऊन, भोजन करण्याचे पूर्वी प्रथम गाई, ब्राह्मण, लक्ष्मी आणि नारायण ह्यांचें पूजन करावें ॥ ५२ ॥ त्याचप्रमाणें माळा, गंध, नैवेद्य आणि भूषणें ह्या उपचारांनीं सुवासिनी स्त्रियांचें पूजन करावें आणि त्याचप्रमाणें पतीचें पूजन करून त्याच्या सेवेविषयीं तत्पर असावें व तो आपल्या कुक्षीमध्यें आहे असें चिंतन करीत असावें ॥ ५३ ॥ असो. हें पुत्रोत्पत्ति करणारें संवत्सरावधि व्रत जर तूं अविच्छिन्न आचरण करिशील, तर तुला इंद्रघातक पुत्र होईल ॥ ५४ ॥ हे राजा, 'नंतर त्या दितीनें ठीक आहे, मी ह्याप्रमाणेंच व्रत आचरण करीन' असें म्हटलें आणि इंद्राला मारणारा पुत्र आपणाला होणार ह्या अभिमानानें तिच्या मनाला हर्ष होऊन तिनें कश्यपाचें वीर्य धारण केलें व तें व्रत ती सांगितल्याप्रमाणें आचरण करूं लागली ॥ ५५ ॥ हे राजा, इकडे ज्ञानसंपन्न इंद्रानें त्या आपल्या मावशीचा हेतु जाणून, आश्रमामध्यें व्रतस्थ असलेल्या त्या दितीची सेवकवृत्तीनें तो शुश्रूषा करूं लागला ॥ ५६ ॥ पुष्पें, फळें, मुळें, समिधा, दर्भ, पत्रें, अंकुर, मृत्तिका आणि उदक हे सर्व पदार्थ तो तिला नित्य वेळच्या वेळीं वनांतून आणून देत असे ॥ ५७ ॥ हे राजा, ज्याप्रमाणें पारधी मृगांना फसविण्याकरितां मृगाचा वेष धारण करितो, त्याचप्रमाणें त्या व्रतस्थ दितीच्या व्रतामध्यें कांहीं तरी छिद्र प्राप्त होण्याची इच्छा करणारा तो इंद्र, साधुवेष धारण करून कपटानें तिची सेवा करूं लागला ॥ ५८ ॥ परंतु हे राजा, छिद्रान्वेषणाविषयीं तत्पर असणाऱ्याहि त्या इंद्राला जेव्हां व्रतामध्यें कांहींच छिद्र सांपडेना, तेव्हां तो आपलें कार्य आतां कसें होईल अशी तीव्र चिंता करूं लागला ॥ ५९ ॥ असें होतां होतां एक वेळीं व्रताचरणाच्या श्रमामुळें कृश होऊन प्रारब्धानें मोहित झालेली ती दिति मुखमार्जन व पादप्रक्षालन न करितां उष्ट्यानेंच संध्याकाळीं निद्रिस्त झाली ॥ ६० ॥ इतक्यामध्यें ती संधि साधून, जिचें चित्त निद्रेनें हरण केलें आहे अशा त्या दितीच्या उदरामध्यें योगाधिपति इंद्र आपल्या योगमायेनें प्रविष्ट झाला ॥ ६१ ॥ तेथें त्यानें प्रथम सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेल्या गर्भाचे वज्रानें सात तुकडे केले. असें केल्यावर जेव्हां तो गर्भ रोदन करूं लागला, तेव्हां इंद्रानें, 'तूं रोदन करूं नकोस' असें त्याला गोड शब्दांनीं सांगून त्या एकेका तुकड्याचे फिरून सात सात तुकडे केले ॥ ६२ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें जेव्हां तो इंद्र त्यांना वज्रानें तोडूं लागला, तेव्हां ते सर्व हात जोडून त्याला म्हणूं लागले कीं, 'हे इंद्रा, आम्ही मरुद्गणनामक तुझे भ्राते असतां तूं आम्हांस मारण्याची काय म्हणून इच्छा करितोस?' ॥ ६३ ॥ ह्या त्यांच्या भाषणावरून हे अगदीं अनन्यभावानें आपल्या आज्ञेमध्यें वागणारे मरुद्गण आहेत असा निश्चय करून इंद्रानें त्यांस सांगितलें कीं, हे मरुद्गण हो, आतां तुम्हीं भिऊं नका, तुम्ही माझे भ्राते आहां ॥ ६४ ॥ असो. हे राजा, द्रोणपुत्र अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रानें दग्ध झालेला असतांहि तूं जसा मरण पावला नाहींस, त्याप्रमाणें इंद्रवज्रानें अनेक प्रकारांनी छिन्नभिन्न झालेला तो दितीचा गर्भ भगवत्कृपेमुळें मरण पावला नाहीं ॥ ६५ ॥ हे राजा, आदिपुरुष भगवंताचें एकवार पूजन करूनहि पुरुषाला

त्याचें साम्य प्राप्त होतें. [illegible] एक वर्षपर्यंत त्या दितीनें श्रीहरीचें अर्चन केलें असल्यामुळें तिचा गर्भ मरण पावला नाहीं हें आश्चर्य नव्हे. गर्भाच्या त्या शकलांपासून मरुद्गणनामक इंद्रासह पन्नास देव उत्पन्न झाले आणि त्यांच्या ठिकाणीं असलेला दैत्यत्वरूप मातृदोष दूर करून इंद्रानें त्यांना यज्ञामध्यें सोमपानाचे अधिकारी केलें ॥ ६६ ॥ ६७ ॥ इकडे दितीनें निजून उठल्यावर इंद्रासह त्या अग्नीसारख्या तेजस्वी कुमारांना अवलोकन केलें; पण इंद्राविषयीं मनांत क्रोध न आणितां ती दिति संतुष्टच झाली ॥ ६८ ॥ नंतर ती इंद्राला म्हणाली, —बा इंद्रा, देवांना भय उत्पन्न करणारा पुत्र प्राप्त व्हावा ह्या इच्छेनें मी हें अतिदुष्कर व्रत आचरण केलें होतें ॥ ६९ ॥ हे पुत्रा, मी एकाच पुत्राचा संकल्प केलेला असतां हे एकूणपन्नास पुत्र कसे झाले, हें जर तुला माहीत असेल तर खरें सांग; खोटें सांगू नको ! ॥ ७० ॥

इंद्र म्हणाला, —हे माते, मी तुझ्या मनांतील निश्चय जाणून धर्माकडे लक्ष न देतां केवळ स्वार्थबुद्धीनें तुझ्या समीप येऊन राहिलों आणि संधि साधून तुझ्या गर्भाचें छेदन केलें ॥७१॥ प्रथमत: मी तुझ्या गर्भाचे सात तुकडे केले असतां ते तात्काळ सात पुत्र झाले. नंतर त्या सातांपैकीं प्रत्येकाचे सात सात असे एकूणपन्नास तुकडे केले; पण ते मरण पावले नाहींत, तर पुत्रच झाले. हें मोठें आश्चर्य पाहून भगवत्पूजेची ही कांहीं तरी अवांतर फलभूत अवर्णनीय सिद्धिच आहे, असा मीं निश्चय केला ॥ ७२ ॥ ७३ ॥ जे निष्काम बुद्धीनें भगवंताचें आराधन करीत असतात व त्याच्यापासून मोक्षाचीहि इच्छा करीत नाहींत, ते पुरुष खरोखर स्वार्थाविषयीं निपुण होत असें शास्त्रामध्यें सांगितलें आहे ॥ ७४ ॥ ह्यास्तव आपला आत्मा आणि स्वानंदप्रद असा जगन्नाथ देव यांचें आराधन केल्यावर, कोणता बरें ज्ञानी पुरुष विषयभोगाची इच्छा करील ? कारण, नरकामध्यें सुद्धां विषयभोग आहेतच ॥ ७५ ॥ तेव्हां, हे परमपूज्य माते, मज मूढाचा हा अपराध क्षमा करणें हें तुला योग्य आहे. तुझा हा गर्भ मृत झाला असूनहि ईश्वरकृपेनें वांचला हें फार चांगलें झालें ॥ ७६ ॥

शुक्राचार्य म्हणाले, —ह्याप्रमाणें इंद्रानें आपला शुद्ध भाव दर्शविला असतां त्याच्यायोगानें संतुष्ट झालेल्या दितीनें इंद्राला स्वर्गीं जाण्याविषयीं आज्ञा दिली; तेव्हां तो प्रभु इंद्र मरुद्गणांसह तिला नमस्कार करून स्वर्गाप्रत निघून गेला ॥ ७७ ॥ हे राजा, तूं मरुद्गणांची मंगलकारक जन्मकथा मला विचारिली होतीस, ती ही सर्व मीं तुला सांगितली आहे. आतां तुला मी आणखी काय सांगू बरें ? ॥ ७८ ॥

**अठरावा अध्याय समाप्त**

# अध्याय १९ वा

परीक्षित्‌राजा म्हणाला,—हे ब्रह्मनिष्ठ मुने, ज्याच्यायोगानें विष्णु प्रसन्न होतो असें पुंसवननामक पुत्रोत्पत्तिकारक व्रत तूं सांगितलेंस; पण त्याचा विस्तार जाणण्याची मला इच्छा आहे ॥ १ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, मार्गशीर्ष महिन्यांतील शुक्ल पक्षामध्यें भर्त्याची आज्ञा घेऊन स्त्रीनें प्रतिपदेस ह्या सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या व्रताचा आरंभ करावा ॥ २ ॥ प्रथमतः मरुद्गणांची जन्मकथा श्रवण करून व्रत करण्याकरितां ब्राह्मणांची अनुज्ञा घ्यावी आणि दांत घांसून, स्नान करून व शुभ्र वस्त्र नेसून अलंकार धारण करावे, आणि नंतर भोजनाचे पूर्वी लक्ष्मीसह भगवान् नारायणाचें पूजन करावें ॥ ३ ॥ 'हे पूर्णमनोरथा परमेश्वरा, तुझ्या ठिकाणीं सर्व कांहीं वस्तूंची परिपूर्णता आहे; कारण, तूं निरपेक्ष असून लक्ष्मीपति आहेस व तुझ्या ठिकाणीं अणिमादि सर्व सिद्धि आहेत; त्या तुज भगवंताला वारंवार नमस्कार असो ॥ ४ ॥ हे ईश्वरा, ज्या अर्थी तूं कृपा, श्री, ऐश्वर्य, महिमा, वीर्य आणि सत्य संकल्प इत्यादि सर्व गुणांनीं परिपूर्ण आहेस, त्या अर्थी तूं भगवान् षड्गुणैश्वर्यसंपन्न सर्वसमर्थ आहेस ॥ ५ ॥ हे विष्णुपत्नि, हे महामाये, हे परमेश्वराच्या लक्षणांनीं परिपूर्ण महाभाग्यशाली लोकमाते, तूं मजवर प्रसन्न हो, मी तुला नमस्कार करित्यें, ह्या मंत्रांनीं नमस्कार करावा ॥ ६ ॥ 'षड्गुणैश्वर्यसंपन्न, पुरुषोत्तम, महाप्रभाववान्, लक्ष्मीपति आणि महाविभूतींनीं युक्त अशा तुज भगवंताला ॐकारपूर्वक नमस्कार करून, मी पूजेचे उपचार अर्पण करित्यें' ह्या मंत्रानें स्वस्थ अंतःकरणपूर्वक प्रतिदिवशीं आवाहन, अर्घ्य, पाद्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, भूषणें, गंध, पुष्पें, दीप आणि नैवेद्य इत्यादि उपचार श्रीविष्णूला समर्पण करावा ॥ ७ ॥ मग नैवेद्याचा जो शेष राहिला असेल त्याचे बारा भाग करून षड्गुणैश्वर्यसंपन्न पुरुषोत्तम आणि लक्ष्मीपति अशा परमेश्वराला 'ॐ नमः स्वाहा' या मंत्रानें अग्नीमध्यें त्यांच्या बारा आहुती द्याव्या ॥ ८ ॥ असो. ह्याप्रमाणें सर्व संपत्तीची इच्छा करणाऱ्या स्त्रीनें सर्व भोगांचें उत्पत्तिस्थान व सर्व मनोरथ पूर्ण करणारीं अशीं जीं उभयता लक्ष्मीनारायण, त्यांचें भक्तीनें नित्य पूजन करावें ॥ ९ ॥ आणि भक्तीनें नम्र झालेल्या अंतःकरणानें भूमीवर त्यांना साष्टांग नमस्कार घालून नंतर पूर्वोक्त मंत्राचा दहा वेळ जप करावा आणि स्तोत्र पठण करावें ॥ १० ॥ हे लक्ष्मीनारायण हो, तुम्ही सर्व जगताचें मुख्य कारण व प्रभु आहां. हे प्रभो, ही तुझी स्त्री लक्ष्मी तर सूक्ष्म, दुर्ज्ञेय, माया आणि शक्ति ह्या नांवांनीं युक्त अशी साक्षात् प्रकृतिच आहे ॥ ११ ॥ तिचा नियंता जो परमपुरुष तो तूंच आहेस. हे परमेश्वरा, तूं सर्वयज्ञरूपी आहेस व ही साक्षात् यज्ञ-विधिस्वरूपी आहे. तूं फलभोक्ता असून ही साक्षात् क्रिया आहे ॥ १२ ॥ तूं सत्त्वादिक गुणांना प्रगट करणारा व उपभोग घेणारा काळ असून ही देवी सत्त्वादि गुणांची

साम्यावस्था आहे. तूं सर्व शरिरांत राहणारा अंतरात्मा आणि ही लक्ष्मी शरीर व इंद्रियें ह्यांचा आश्रय आहे. तूं नामरूपांचा आधार आणि प्रकाशक असून ही भगवती लक्ष्मी नामरूपस्वरूपिणी आहे. ह्याप्रमाणें तुम्हां उभयतांचा संबंध आहे ॥ १३ ॥ ज्या अर्थी तुम्हां उभयतां त्रैलोक्याला वर देणारे आणि सर्वश्रेष्ठ आहां, त्या अर्थी ह्या कीर्तिमंता देवा, माझे मोठमोठेहि मनोरथ तुजपासून परिपूर्ण होवोत ॥ १४ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें वरप्रद नारायणाची लक्ष्मीसह स्तुति करून तो नैवेद्य एकीकडे करावा आणि त्यांना आचमन देऊन पुनरपि त्याचें पूजन करावें ॥ १५ ॥ नंतर भक्तिनम्र अंत:करणानें पूर्वोक्त स्तोत्रानें त्यांची स्तुति करावी व यज्ञपुरुषाचें उच्छिष्ट अवधाण करून पुनरपि श्रीहरीचें पूजन करावें आणि त्याचप्रमाणें ईश्वरबुद्धीनें परम भक्तिपूर्वक जे जे उपचार पतीला प्रिय असतील त्या त्या उपचारांनीं त्याला भजावें; तसेंच पतीनेंहि स्वत: प्रेमशील होऊन पत्नीच्या लहानमोठ्या कर्मांना अनुकूल व्हावें ॥ १६ ॥ १७ ॥ दंपत्यापैकीं एकानेंहि केलेलें कर्म उभयतांना फलदायक होतें. ह्याकरितां पत्नी रजोदर्शनादि दोषामुळें पूजन करण्यास अयोग्य असेल, तर पतीनेंच स्वस्थांत:करणपूर्वक हें सर्व व्रत करावें ॥ १८ ॥ कारण, असा जरी प्रसंग आला तरी हें विष्णुव्रत धारण करणाऱ्यानें त्याचा विच्छेद करूं नये. असो. नियमपूर्वक हें व्रत धारण करणारानें देवाचें पूजन केल्यानंतर माळा, गंध, नैवेद्य आणि अलंकार इत्यादि उपचारांनीं ब्राह्मण व सुवासिनी यांचें प्रतिदिवशीं पूजन करावें ॥ १९ ॥ नंतर देवास देवघरामध्यें स्थापन करून देहाची शुद्धि आणि सर्व मनोरथांची पूर्णता होण्याकरितां त्याला निवेदन केलेला प्रसाद प्रथमत: यथायोग्य विभागानें इतरांस देऊन नंतर आपण भक्षण करावा ॥ २० ॥ असो. ह्या पूजाप्रकारानें बारा महिन्यांचें एक वर्षपर्यंत पूजन करून कार्तिक महिन्याच्या शेवटच्या दिवशीं साध्वी स्त्रीनें उपवास करावा ॥ २१ ॥ नंतर दुसरे दिवशीं प्रभातकाळ झाल्यावर स्नान करून पूर्वीप्रमाणें भगवान् विष्णूचें पूजन करावें आणि दुधामध्यें शिजविलेल्या घृतयुक्त चरूनें पार्वण स्थालीपाकाच्या विधानानें पतीनें बाराच आहुतींचा होम करावा ॥ २२ ॥ नंतर सुप्रसन्न झालेल्या द्विजांनीं दिलेले आशीर्वाद शिरसामान्य करून त्यांना मस्तकानें प्रणाम करावा आणि त्यांच्या अनुज्ञेनें आचार्यास अग्रभागीं भोजनास बसवून मौनपूर्वक बंधुवर्गासह आपण भोजन करावें. मग सत्पुत्रदायक व सौभाग्यकारक असा चरुशेष पत्नीला अर्पण करावा ॥ २३ ॥ २४ ॥ हे राजा, पुरुषानें यथाविधि हें व्रत केलें असतां त्याला भगवंतापासून इहलोकींच इष्टार्थप्राप्ति होत्ये. स्त्रीनें हें व्रत आचरिलें असतां तिला सौभाग्य, संपत्ति, दीर्घायुषी पति, यश व गृह हीं प्राप्त होतात ॥ २५ ॥ त्याचप्रमाणें कन्येनें केलें असतां तिला सर्वलक्षणसंपन्न पति प्राप्त होतो; निपुत्रिक विधवेनें हें व्रत केलें असतां पापापासून ती मुक्त होऊन उत्तम गतीस जात्ये. जिचीं मुलें वांचत नाहींत अशा स्त्रीनें हें व्रत केलें असतां तिला दीर्घायुषी पुत्र प्राप्त होतात, धनाढ्य असूनहि भाग्यहीन अशा स्त्रीनें हें व्रत केलें असतां ती सौभाग्यवती होत्ये; कुरूप स्त्रीनें हें व्रत केलें असतां तिला उत्तम रूप प्राप्त होतें; रोग्यानें हें व्रत केलें असतां तो स्वत: रोगापासून मुक्त होऊन

इंद्रियांसह दृढदेही होतो आणि यज्ञादिक कर्मामध्यें व श्राद्धकर्मामध्यें पुरुषानें हें पठण केलें असतां त्याचे पितर व देव अत्यंत तृप्त होतात ॥ २६ ॥ २७ ॥ व ते संतुष्ट झाले असतां सर्व मनोरथ पूर्ण करितात. तशीच अग्निद्वारा हविर्भाग ग्रहण करणारीं श्रीहरि आणि लक्ष्मी हीं उभयतां होमसमाप्तिकाळीं संतुष्ट होऊन व्रत करणाऱ्याचे सर्व मनोरथ पूर्ण करितात. असो. हे राजा, ह्याप्रमाणें मरुद्गणांची मोठी पुण्यकारक जन्मकथा व दितीचें महाव्रत हें सर्व तुला कथन केलें ॥ २८ ॥

**एकोणिसावा अध्याय समाप्त**

---

# सहावा स्कंध समाप्त

---